# साईच्या शुभ्र कळ्या

## उजळवून निमते

**समईच्या शुभ्र कळ्या**

**प्रा० वि० ह० कुळकर्णी ह्यांच्या स्मृतिग्रंथाच्या निर्मितीसंदर्भातील निवडक पत्रांचा संग्रह**

२१ जुलै २०२४

गुरुपौर्णिमा शके १९४६

- सदर मजकुराची अक्षरजुळणी लाटेक् (LaTeX) ही मुक्त (फ्रि ॲण्ड ओपन सोर्स) आज्ञावली वापरून करण्यात आली आहे.

**प्रकाशक** : आशा धारप

**अक्षरजुळणी** : सायली दशरथ थारळी, चैत्राली केळकर, सुशान्त देवळेकर

**मुखपृष्ठ** : प्रकाश केणी

**छायाचित्रसंपादनसाहाय्य** : मनाली दशरथ थारळी

**मुद्रितशोधनसाहाय्य** : अमित म्हाडेश्वर




ॲज यू लाइक हिम ह्या ग्रंथाचे मुखपृष्ठ.

मुखपृष्ठकार : चंद्रजीत यादव

प्रा० वि० ह० कुळकर्णी ह्यांच्यावरील ज्या स्मृतिग्रंथासंदर्भातील निवडक पत्रव्यवहार इथे संकलित केला आहे त्या स्मृतिग्रंथाची संगणकीय प्रत खालील दुव्यावर उपलब्ध आहे.
https://archive.org/details/20240627_20240627_1056

नमस्कार,

प्रथम सर्वांचे स्वागत व शुभेच्छा..!

तसेच, या virtual / simulated inauguration ला माझ्या गैरहजेरीबद्दल क्षमस्व.

‘As You Like Him’ या आशाताई धारप यांनी प्रकशित केलेल्या माझ्या वडिलांवरील पुस्तकावेळी माझे तीर्थरूप वडील प्रा० वि० ह० कुळकर्णी हे हयात नव्हते. त्याचप्रमाणे, त्या पुस्तकाला वाचकांचा जो प्रचंड प्रतिसाद मिळाला त्या ‘संगणकीय पत्रसंग्रहाच्या' या प्रकाशनाच्यावेळी, दुर्दैवाने आज माझी थोरली बहीण ‘इरावती’ हयात नाही. जिने ‘As You Like Him’ चे प्रकाशन केले होते. या योगायोगाला काय म्हणायचे..? असो.

एखाद्या शिक्षकाबद्दलची ‘गुरुभक्ती’ म्हणजे काय व ती कशी असते आणि ती कशी टिकवावी ते आमच्या आशाताई धारप यांच्याकडून शिकावे.

‘As You Like Him’ हे पुस्तक, त्याला शेकडोंनी आलेले नामवंत व इतर वाचकांचे पत्ररूपी प्रतिसाद जपून ठेवणे हे अत्यंत अवघड काम आहे.

याला चिकाटीच हवी. यावर न थांबता ‘As You Like Him’ चा PDF रूपी संग्रहित ‘संगणकीय पत्रसंग्रह’ काढावा अशी कल्पक व कष्टमय संकल्पना आशाताईंच्या निस्वार्थी मदतनिसांच्यामुळे त्यांच्या मनी रुजली व रुजविली गेली. आणि ती फलद्रूपही केली गेली. हे सर्व कौतुकास्पद असून वाखाणण्यासारखे आहे. हा निष्ठावान गुरुभक्तीचाच दैवी चमत्कार आहे. तेव्हा गुरुप्रेमी आशाताई आपले मनापासून शतशः अभिनंदन..! थोडक्यात, अशा या दुर्मिळ मौलिकतेचे मोल किती अनमोल आहे याचा वाचकांना निश्चित प्रयत्य येईल यात शंका नाही. तसेच, ‘As You Like Him’ चा तिसरा खंडही प्रकाशित व्हायला वेळ लागणार नाही. याची मी खात्री बाळगतो...

आशाताईंचे आणखी एक स्वप्न पूर्ण होत आहे. प्रत्यक्षात नसले तरी आधुनिक तंत्रज्ञानाप्रमाणे या ‘संगणकीय पत्रसंग्रहाचे’ Virtual / Simulated Inauguration गुरुपौर्णिमेच्या शुभदिनी आज माझ्या हस्ते होत आहे याबद्दल मी स्वतःला अभिमानासह नशिबवान समजतो.

त्याचबरोबर विमोचनासह लोकार्पण समारंभ साजरा झाला व ‘संगणकीय पत्रसंग्रहाचे’ प्रकाशन झाले असे मी जाहीर करतो. धन्यवाद.

आपला नम्र,
जयंत विठ्ठल कुळकर्णी.
न्यू यॉर्क, अमेरिका.
गुरुपौर्णिमा.
रविवार, २१ जुलै, २०२४.



# पत्रसंग्रहाच्या रचनेतील धोरण

- प्रा० वि० ह० कुळकर्णी ह्यांच्या आठवणींचा संग्रह **ॲज यू लाइक हिम** ह्या नावाने प्रकाशित झाला. ह्या स्मृतिग्रंथाच्या निर्मितीसंदर्भात विविध मान्यवरांशी झालेल्या पत्रव्यवहारातील काही निवडक पत्रे ह्या संग्रहात समाविष्ट केली आहेत.
- ह्यांपैकी मूळ पत्रांची संगणकीय (डिजिटल) छायाचित्रे आणि त्यातील टंकलिखित पाठ्य (मजकूर) हे दोन्ही ह्या संग्रहात समाविष्ट केले आहेत.
- ही पत्रे पोस्टकार्ड, आंतरदेशीय पत्रे तसेच साध्या वा मुद्रांकित (लेटरहेड) असलेल्या कागदावर लिहिलेली अशी आहेत. त्यामुळे पत्रांवरील मजकूर आणि मांडणीसाठी उपलब्ध असलेली जागा ह्यांनुसार मूळ पत्राच्या लिहिलेल्या भागाच्या छायाचित्राची निवड केली आहे.
- छायाचित्रांत दृश्यरूपाच्या दृष्टीने काही प्रक्रिया करून सुधारणा करता आल्या तर त्या केल्या आहेत. उदा० पत्रातील पाठ्य पुसट दिसत असेल तर तंत्रज्ञानाचे साहाय्य घेऊन ते अधिक उठावदार करण्याचा प्रयत्न केला आहे.
- पत्रातील मजकूर शक्यतो यथामूल लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे शुद्धलेखनाच्या दृष्टीने काही मजकूर वेगळा वाटू शकतो.
- काही ठिकाणी वाचनीयतेच्या दृष्टीने बदल केले आहेत. उदा० पत्रांमध्ये जरी संक्षेप दाखवण्यासाठी पूर्णविरामचिन्ह योजलेले असले तरी मुद्रणपरंपरेला अनुसरून संक्षेप दाखवताना संक्षेपचिन्ह (०) योजले आहे.
- साधारणतः पत्राचे छायाचित्र डावीकडील (समसंख्या असलेल्या) पृष्ठावर आणि पत्राचे पाठ्य उजवीकडील (विषमसंख्या असलेल्या) पृष्ठावर अशी मांडणी करण्याचा शक्यतो प्रयत्न केला आहे. परंतु पत्रांच्या पृष्ठांचे आकारमान, लिहिलेल्या पृष्ठांची संख्या इत्यादी बाबींमुळे हे धोरण सर्वत्र निरपवादरीत्या राबवता आलेले नाही.

# अनुक्रमणिका

# प्रा० वि० ह० कुळकर्णी यांच्या चरित्राची रूपरेषा



प्रा० वि० ह० कुळकर्णी यांचा जन्म १४ एप्रिल १९०२ साली कशेळी या गावी झाला. कशेळी हे गाव रत्नागिरी जिल्ह्यातील राजापूर तालुक्यात आहे.

प्रत्येक गावाचे काही ना काहीतरी वैशिष्ट्य असते, तसे कशेळी या गावाचेही आहे. या गावाने अनेक सुप्रसिद्ध व्यक्तींना जन्म दिला आहे. कशेळीचे राजारामशास्त्री भागवत (१८५१–१९०८ ) हे त्या काळात गाजलेले सुधारक होते. ते जातिभेद मानीत नसत. प्रसिद्ध व लोकप्रिय लेखक विठ्ठल सीताराम गुर्जर हे कशेळीचेच आणि अनेक लेख व पानिपतावर प्रचंड प्रास्ताविक ग्रंथ लिहिणारे इतिहासतज्ज्ञ त्र्यं० शं० शेजवलकर हेही कशेळीचेच. ॲनी बेझंटबाईंचे चरित्र व इतर ग्रंथ लिहिणारे थिऑसॉफिस्ट व कशेळीचे आणखी एक ग्रंथकार म्हणजे ठाण्याचे राजाराम भागवत. सुप्रसिद्ध लेखिका दुर्गाबाई भागवत यांचा जन्म जरी पंढरपूर येथे झाला असला तरी त्यांच्या वडिलांचे गाव कशेळीच आहे. हे सर्व येथे सांगण्याचे कारण म्हणजे कशेळी हे लहान गाव असले तरी मोठमोठी माणसे निर्माण झाली आहेत.

कशेळी या गावाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे तेथील ब्राह्मणांची जी ४०–५० घरे आहेत ती सर्व कऱ्हाडे ब्राह्मणांची आहेत. प्रा० कुळकर्णी हेही कऱ्हाडे ब्राह्मण असून त्यांचे मूळ आडनाव ठाकूर हे आहे.

प्रा० वि० ह० कुळकर्णी यांच्या वडिलांची नोकरी ही फिरतीची असल्यामुळे त्यांचे शिक्षण अनेक ठिकाणी झालेले आहे. कशेळी, राजापूर, देवगड व चिपळूण या ठिकाणी त्यांचे पाचवीपर्यंतचे शिक्षण झाले. चिपळूण येथे त्यांच्या वडिलांचे बरीच वर्षे वास्तव्य झाल्यामुळे तिथे त्यांचा राहण्याचा योग जास्त आला. परंतु त्यावेळी तिथे फक्त पाचच इयत्ता होत्या. म्हणून पुढील शिक्षणाकरता ते मुंबईला फणसवाडीतील जगन्नाथाचे चाळीत आपल्या चुलत्यांकडे राहावयास आले. प्रा० कुळकर्णी यांना वाङ्मयाची विशेष गोडी लागली ती मुंबईतील आर्यन शाळेतील शैक्षणिक वर्षात. कॉ० डांगे, पत्रकार त्र्यंबक विष्णू पर्वते, ग० त्र्यं० माडखोलकर हे त्यांचे या शाळेतील सहाध्यायी होते.

मॅट्रिक पास झाल्यानंतर प्रा० कुळकर्णी व काही स्नेही मंडळी गोरेगाव येथे राहावयास गेली. प्रा० कुळकर्णी हे तेथून झेवियर्स कॉलेजात शिकावयास येत असत. तिथे खं० सा० दौंडकर, प्रा० अनंत काणेकर, के० नारायण काळे, वा० रा० ढवळे इत्यादी मित्रांच्या सहवासात त्यांचे साहित्यप्रेम वृद्धिंगत झाले आणि त्यांच्या व्यासंगाला विशिष्ट दिशा मिळाली.

गोरेगाव येथे सात-आठ वर्षे राहिल्यानंतर काही कौटुंबिक अडचणींमुळे प्रा० कुळकर्णी दादर येथे राहावयास येऊन पुढे तेथेच स्थायिक झाले. एम० ए० होईपर्यंत प्रा० कुळकर्णी हे मुंबईतील ‘S.L.I.S.S. Girl’s High School’ मध्ये अध्यापकाचे काम करीत असत. त्यानंतर काही वर्षे ते जोगेश्वरी येथील इस्माईल कॉलेजमध्ये मराठी व इंग्रजी हे विषय शिकवीत असत. परंतु त्यावेळी ते कॉलेज मुस्लिम संस्कृतीचे केंद्र असल्यामुळे तेथे मुस्लिमेतर प्राध्यापकांवर बरीच नियंत्रणे होती. म्हणून त्यांनी ते कॉलेज सोडून माटुंगा येथील रामनारायण रुईया कॉलेजात प्राध्यापकपद स्वीकारले. १९४१ पासून १९६२ पर्यंत एकवीस वर्षे ते इंग्रजी विषयाचे प्राध्यापक होते व शेवटची काही वर्षे त्या शाखेचे प्रमुख होते.

तेथून निवृत्त झाल्यावर माहीम येथील रुपारेल कॉलेजच्या निमंत्रणावरून तेथे ते इंग्रजी विषयाचे पाच वर्षे प्राध्यापक होते.

प्रा० कुळकर्णी यांनी विपुल लेखन केले आहे. 'प्रतिभा' व 'ज्योत्स्ना' या नियतकालिकांचे ते काही काळ संपादक होते. शिवाय ते प्रत्येक अंकात 'सुहास' या टोपण-नावाखाली 'हास-परिहास' हे विनोदप्रचुर सदरही नियमितपणे चालवीत. त्यांनी प्रसिद्ध पाश्चिमात्य व्यक्तींवर लिहिलेले लेख 'शब्दचित्रे' या नावाने पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांनी 'किशोर' मासिकात महाराष्ट्रातील अर्वाचीन नामवंत व्यक्तींवर लिहिलेले लेख, 'आधुनिक महाराष्ट्र ज्यांनी घडविला' या शीर्षकाखाली पाच भागांत 'केमकर प्रकाशनां'नी प्रसिद्ध केले आहेत. मुंबई आकाशवाणीवर अनेक वर्षे ते निरनिराळ्या विषयांवर भाषणे लिहून देत व अनेक व्यक्तींच्या चर्चामंडळाचे ते संचलन करीत. याशिवाय त्यांनी लिहिलेले लघुनिबंध, विनोदी लेख, परीक्षणे व प्रस्तावना ही एकत्र ग्रंथरूपाने प्रसिद्ध केली तर तो ग्रंथ पाचसहाशे पृष्ठांचा होईल. मुंबई मराठी साहित्य संघाचे ते अगदी सुरुवातीपासून सभासद असून त्या संस्थेतर्फे त्यांनी गुंफलेली शि० म० परांजपे यांजवरील व्याख्यानमाला स्मरणीय व महत्त्वाची आहे. संक्षिप्तरूपाने त्याचे पुस्तकही प्रसिद्ध झालेले आहे. मराठी कादंबरीचा अगदी सुरवातीपासून १९७५ पर्यंतचा इतिहास व 'न० चिं० केळकर वाङ्मयीन दर्शन' हे त्यांचे लेख प्रसिद्ध ग्रंथांत समाविष्ट केले गेले आहेत. ऑस्कर वाइल्डच्या 'विंडरमियर्स फॅन' या नाटकाचा 'शोभेचा पंखा' या नावाने त्यांनी अनुवादही केला होता आणि त्यात दुर्गाबाई खोटे व वनमाला यांनी प्रमुख स्त्री-भूमिका केल्या होत्या.

त्यांनी चारशे पृष्ठांचे 'अच्युत बळवंत कोल्हटकर : चरित्र व वाङ्मय' आणि 'जॉर्ज बर्नार्ड शॉ' व 'ग० त्र्यं० माडखोलकर' यांचे चरित्र अशी पुस्तके लिहिली असून ती प्रसिद्ध झाली आहेत. यावरून त्यांच्या साहित्यसेवेतील विविधता स्पष्ट होईल.

# जयंत कुळकर्णी यांचे मनोगत

नमस्कार,

आशाताई धारप यांनी जेव्हा मला 'ॲज यू लाईक हिम' या माझ्या तीर्थरूप वडिलांवर म्हणजे, आमच्या अण्णांवरील पुस्तकाला आलेल्या संग्रहित प्रतिसादांवर निवेदन लिहायला सांगितले. तेव्हा, माझ्या मनात थोडीशी धास्ती निर्माण झाली होती. मात्र, आमच्या कुळकर्णी घराण्यातील अण्णांचा धाकटा मुलगा म्हणून आशाताईंनी मला निवेदन लिहायला सांगावे हा माझा बहुमान असल्याने मी होकार दिला. आशाताईंनी Shakespeare च्या 'As You Like It' या गाजलेल्या नाटकावरील शीर्षकात थोडा बदल करून अतिशय विचारपूर्वक 'ॲज यू लाईक हिम' हे शीर्षक निवडले होते. दुर्दैवाने ते पुस्तक प्रकाशित होण्याआधीच आमच्या अण्णांचे अमेरिकेत निधन झाले होते...

Shakespeare च्या गाजलेल्या 'As You Like It' 'Love' ही नाटकाची central theme होती. त्याचप्रमाणे, 'As You Like Him' या पुस्तकाचा मूळ गाभाही तसाच असल्याने त्या पुस्तकाला As We Like Him म्हणून जो आदरपूर्वक प्रचंड प्रतिसाद मिळाला होता. तो सर्व पत्ररूपी प्रतिसाद आशाताईंनी अत्तराप्रमाणे सुगंधी फुलासारखा कुपीत जपून ठेवला होता. हे अतिशय वाखाणण्यासारखे व कौतुकास्पद होते. नव्हे, आहे. केवळ गुरुभक्ती, निर्मळ प्रेम व चिकाटी हेच त्यांमागील प्रमुख कारण आहे. आजच्या युगात हे अनुभवायला मिळणं दुर्मिळ आहे. मंडळी, आज या गोष्टीला चाळीस वर्षांहून अधिक काळ लोटला आहे... तेव्हा, मी किती भाग्यवान आहे त्याचा प्रत्यय येईल. असो. निवेदन लिहिण्यापूर्वी आशाताईंनी मला तो आलेला सर्व पत्ररूपी प्रतिसाद पाठविला. आणि मी तो पाहून व वाचून भारावून गेलो. त्याच कारण म्हणजे, त्यात अनेक नामवंत व्यक्तींची व साहित्यिकांची अण्णांबद्दल भरभरून लिहिलेली पत्रें होती. ती आपण पुढे वाचालच. या पत्ररूपी पुस्तकाला निवेदन लिहिण्यासाठी आशाताईंनी माझी निवड केल्याबद्दल मी आशाताईंचा अत्यंत ऋणी व आभारी आहे. धन्यवाद.

आपला,<br>
जयंत विठ्ठल कुळकर्णी.<br>
न्यूयॉर्क, अमेरिका<br>
गुरुवार, ३० मे, २०२४.

# अुषा देशमुख यांचे मनोगत

श्री० वि० ह० कुळकर्णी हे गेल्या पिढीतील एक महत्त्वाचे असे मान्यवर लेखक होते. मराठी वाङ्मयाच्या इतिहासात त्यांच्या कार्यकर्तृत्वाची नोंद आहे.

माझे पती डॉ० मा० गो० देशमुख यांचे ते जवळचे मित्र होते. माधवरावाचे मुंबई पुण्यातील साहित्यिकांत जे मैत्र होते त्यांत वा० ल० कुळकर्णी, ग्रामोपाध्ये, वा० रा० ढवळे आणि वि० ह० कुळकर्णी यांचा समावेश होता.

ही मंडळी काही कामानिमित्त नागपूर येथे आली की आमच्या बंगल्यावर नागपूरच्या साहित्यिकांसह गप्पागोष्टींचा फड रंगत असे. त्यात कुसुमावती देशपांडे, कवी अनिल, वि० भि० कोलते वामनराव चोरघडे यांचा सहभाग असे. वि० हंचा आणि माधवरावांचा घनिष्ठ संबंध होता.

वि० ह० यांचा आणि माझा परिचय १९७० मध्ये झाला. मुंबईत आम्ही आल्यावर त्यांचे आमच्या घरी येणे जाणे असायचे. अत्यंत मृदू असे त्यांचे व्यक्तिमत्त्व होते. त्यांच्या लेखनात समजावून सांगण्याची भूमिका असे, कुठेही आक्रस्ताळेपणाने किंवा हेकेखोर पद्धतीने ते आपली मतं मांडीत नसत. ऋजुता हा त्यांच्या लेखनाचा जसा विशेष होता तसाच त्यांच्या स्वभावाचाही विशेष होता. माझा त्यांना विनम्र प्रणाम !

अुषा मा० देशमुख

# समईच्या शुभ्र कळ्या

रविवार दि० १७ एप्रिल १९८३ ! आयुष्यातील चिरस्मरणीय दिवस !! 'मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचे' नायगाव येथील सभागृह !!! विद्वत् जनांनी भरलेले. अपूर्वशा ज्ञानगंधाने भारलेले (जणू राजा जनकाचा ज्ञानदरबार) ह्या ज्ञानदरबाराचे जनक राजे म्हणजे ज्येष्ठ प्राध्यापक व साहित्यिक पूज्य श्री० वि० ह० कुळकर्णी सर !!! दैववशात् पू० वि० ह० सर लौकिक अर्थाने ह्या शुभप्रसंगी प्रत्यक्ष हजर राहू शकत नव्हते. ते सपत्नीक व्यासपीठावरील छायाचित्रात विसावले होते. असा हा विशेष ज्ञानदरबार भरण्याचे कारण म्हणजे पू० वि० ह० सरांच्या आठवणींच्या पुस्तकाचा (ॲज यू लाइक हिम) प्रकाशन-समारंभ. पुस्तकाचे प्रकाशन होणार होते, मुंबई विद्यापीठाचे तेव्हाचे कुलगुरू सन्माननीय डॉ० राम जोशी ह्यांच्या हस्ते ! व्यासपीठावर विराजमान होते कुलगुरू डॉ० राम जोशी, डॉ० सौ० सरोजिनी वैद्य, डॉ० विठ्ठल प्रभू, प्रा० अविनाश केळकर व पू० रा० भि० जोशी सर, सभागृहात डॉ० धनंजय कीर, श्री० नंदू नाटेकर, प्रा० रमेश तेंडुलकर (क्रिकेटपटू सचिन तेंडुलकर ह्यांचे वडील) सौ० सुधाताई जोशी, सौ० कामिनी आगासकर, पू० श्री० मनोरमाबाई फडके, त्यांच्या भगिनी सौ० मालिनी केतकर, पू० फडके मावशींच्या सर्वार्थाने अष्टपैलू असलेल्या सुविद्य कन्या सौ० अचला जोशी, आ० श्री० कृष्णराव व सौ० नीलाताई जोशी, आ० के० जी० कुळकर्णी, आदरणीय श्री० शैलाताई लालजी पेंडसे, आ० श्रीम० ताराबाई फडणीस आणि आ० मंगलाताई निगुडकर अशी अनेक मान्यवर मंडळी उपस्थित होती.

व्यासपीठावरील सर्व मान्यवरांच्या भाषणातून, पू० वि० ह० सरांच्या व्यक्तित्वाचे त्यांच्या साहित्यिक कार्य व कर्तृत्वाचे, त्यांच्या उत्कृष्ट प्राध्यापक, हाडांचे शिक्षक असण्याचे, त्यांच्या सामाजिक व वाङ्मयीन बांधिलकीचे आणि बुद्धिचातुर्याने प्रगट होणाऱ्या त्यांच्या शुद्ध व निर्मळ विनोदाचे, सुयोग्य असे शब्दचित्र आदराने व्यक्त होत होते. आनंद आणि विषादाच्या संमिश्र भावनेने भारलेला हा प्रकाशन-सोहळा संपन्न झाला तो पू० वि० ह० सरांच्या अत्यंत आवडत्या अशा 'उफाळत्या चहाच्या' प्रसादाने !

ह्या पुस्तकनिर्मितीच्या संदर्भात ज्या ज्या बुद्धिमान् मान्यवरांशी संपर्क साधला गेला ते सर्व मान्यवर म्हणजे "विश्वमोहिनी शारदेच्या" मंदिराच्या प्रांगणात उभ्या असलेल्या, "अमृतातेही पैजा जिंके" अशा स्वयंप्रकाशित मऱ्हाठी भाषेच्या समईतल्या — स्वतेजाने तळपणाऱ्या — शुद्ध-शुभ्र-पवित्र अशा कळ्या आहेत; प्रत्येक व्यक्तित्व म्हणजे प० पू० श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या शब्दात 'तापहीन मार्तंड' आहे. ही शारदासमर्पित 'सज्जनांची मांदियाळी' म्हणजे — पूज्य वि० ह०, वा० ल०, व० दि० कुलकर्णी सर, गुरूवर्य वि० द० गोखले, प्रा० धों० वि० देशपांडे, आ० पु० ल० देशपांडे, पू० वा० रा० ढवळे, रा० भि० जोशी, माधव मनोहर सर तसेच डॉ० धनंजय कीर, डॉ० रा० चिं० ढेरे, डॉ० राम जोशी, डॉ० विठ्ठल प्रभू आणि सन्माननीय सौ० सुमती देवस्थळे, आ० मंगलाबाई निगुडकर, मनोरमाबाई फडके, आ० शांताबाई शेळके, डॉ० सरोजिनी वैद्य, डॉ० उषाबाई देशमुख आणि इतर; अशा सर्व अनुपमेय- श्रेष्ठ गुरुजनांचे, पुन्हा विशेष आनंदाने स्मरण करताना, त्यांच्या वंदनीय शुभचरणी, संपूर्ण शरणागत आदराने शिरसाष्टांग नमस्कार अर्पण आहे. आणि

एकोपि अक्षरं यस्तु गुरुः शिष्यं निवेदयेत् । पृथिव्यां नास्ति तद् द्रव्यं यद् दत्त्वा हि अनृणी भवेत् ॥

ह्याची पूर्ण जाणीव आहे. 'ॲज यू लाइक हिम' ह्या पुस्तकाच्या प्रकाशनाला आता चाळीस वर्षे उलटून गेली आहेत. ह्या पुस्तकनिर्मितीत ज्या मान्यवरांशी पत्रव्यवहार झाला आणि त्यांची पत्रोत्तरे आली, त्याला आज दस्तऐवज म्हणून, वाङ्मयीन संदर्भ म्हणून, मराठी भाषेची दिशादर्शक वाटचाल म्हणून महत्त्व आहे. जगभरची सर्व मराठी वाचनालये, विशेष अभ्यासक आणि काही वैयक्तिक संबंधित मंडळी, अशा सर्वांना हा पत्रव्यवहार उपलब्ध असावा म्हणून ह्या पत्रसंग्रहाच्या सादरीकरणाचे P.D.F. (Portable Document Format) चे प्रयोजन ! साहित्यिक मूल्यमापन हा ह्या पत्रव्यवहाराचा निकष नाही. पण पूर्वपिढीचे हस्ताक्षर, शुद्धलेखन, वैचारिक बैठक व प्रगल्भता, मराठी भाषेबद्दलची तळमळीची आस्था आणि मराठी भाषेचे तत्कालीन प्रागट्य-स्वरूप, ह्या सर्व गोष्टी निश्चितच महत्त्वाच्या ठरणाऱ्या आहेत.

पू० वि० ह० सर आणि त्यांचे समकालीन स्नेहीजन ह्या सर्वांचा जीवनवेध घेण्याआधी आणि त्यांची सामाजिक, सांस्कृतिक व वाङ्ग्यीन भूमिका व कार्य समजून घेण्याआधी २० व्या शतकाचा विचार करणे अपरिहार्य आहे. १९ वे–२० वे शतक जागतिक स्तरावर अत्यंत महत्त्वाचे आहे. १९ व्या शतकापासून मनुष्यजीवनाच्या सर्व क्षेत्रांत आमूलाग्र बदल होत होते. सर्व ज्ञानक्षेत्रातील होणाऱ्या बुद्धिनिष्ठ चळवळींमुळे (वैज्ञानिक, औद्योगिक, राजकीय व सामाजिक, आर्थिक, वाङ्ग्यीन व कलेची सर्व दालने) अशा अनेक महत्त्वाच्या जीवन-दालनांत जगाचा इतिहास बदलत होता. आ० कार्ल मार्क्स ह्यांचा कम्युनिझमही विशेषत्वाने प्रभावित होत होता, स्त्रियांना समान दर्जा व गुलामगिरीचे उच्चाटन अशा तऱ्हेच्या चळवळीही, कम्युनिझमच्या बरोबरीने धार्मिक रूढ संकल्पनांना तीव्र हादरे सतत देत होत्या. ह्या व अशा सशक्त आचार विचारधारांचे जोरदार प्रवाह घेऊन उजाडले २० वे शतक.

२० वे शतक ! अनेक दृष्टींनी भारतातही अत्यंत महत्वाचे ! राजकीय, सामाजिक, आर्थिक, धार्मिक, शैक्षणिक, वैज्ञानिक, वाङ्ग्यीन अशा अनेक क्षेत्रांत होणारे मूलभूत महत्त्वाचे बदल, समर्थतेने पेलणारे हे भारतातले २० वे शतक ! प० पू० श्री० लोकमान्य टिळकांच्या कर्मप्रवृत्त करणाऱ्या 'गीतारहस्याचे' मर्म जाणून जाणीवपूर्वक वाटचाल करणारे हे शतक. पहिले व दुसरे महायुद्ध ह्याच शतकातले आणि पारतंत्र्य स्वातंत्र्याच्या चळवळीही ह्याच शतकातल्या. प० पू० श्री० महात्मा गांधी आणि प० पू० डॉ० श्री० बाबासाहेब आंबेडकर ह्या युगप्रवर्तक महात्म्यांनी आणि महापुरुष प० पू० श्री० वि० दा० सावरकरांनी भूषवले ते हेच शतक. पू० श्री० सी० व्ही० रामन व पू० डॉ० श्री० होमी भाभा असे महत्त्वाचे वैज्ञानिकही याच शतकातले प० पू० श्री० स्वामी विवेकानंद, रमण महर्षी, जे० कृष्णमूर्ती आणि योगी अरविंद असे श्रेष्ठ आध्यात्मिक विचारवंत जीवनभाष्यकार पाहिले, ऐकले, अनुसरले ते ह्याच शतकाने आणि नादब्रम्हाच्या प्रेषित स्वरसम्राज्ञी लताबाई-आशाबाई ह्यांनी सर्व जगाला नादलुब्ध केले ते हेच २० वे शतक !

२० व्या शतकात वावरलेल्या पू० वि० ह० सर आणि त्यांचे सर्व समकालीन स्नेहीजन ह्या सर्वांनी जागृत विचार बुद्धीने हे शतक पाहिले, समजून घेतले आणि त्याचे बरेवाईट परिणाम अनुभवले. पाश्चात्त्य वाङ्ग्याशी निकटतेने जोडले जाणे आणि ते सर्व वाङ्ग्य अभ्यासणे स्वाभाविकच होते. (ब्रिटीश अंमलाखालील भारतात हे घडणारच होते.) ह्या पाश्चात्य वाङ्ग्याच्या अभ्यासातही, त्या सर्वांनी मराठी भाषेची आस्था प्राणपणाने जपली. धार्मिक-पौराणिक असे वाङ्ग्य-विशेष बदलून ते लौकिक विषयात अवतरत होते. आदरणीय श्री० केशवसुतांनी पहिली तुतारी स्वप्राणाने फुंकली होती आणि त्याच्या बरोबरीने "नव्या मनूतील नवा शिपाई" उभा केला होता. वैज्ञानिक विचार-प्रभावाने वाङ्ग्यातही 'कार्यकारणभाव' प्रभावी ठरत होता, 'शब्दप्रामाण्याचे' महत्त्व कमी होऊ लागले होते. पू० श्री० केशवसुतांनंतर अवतरले 'रविकिरण मंडळ' आणि 'मुंबई मराठी साहित्य संघ'. त्याचबरोबर श्री० मर्ढेकर, कुसुमाग्रज, विंदा करंदीकर, कवी यशवंत, माधवराव पटवर्धन असे महत्त्वाचे कवी आणि रा० भि० जोशी, वा० रा० ढवळे, स्वतः वि० ह० सर असे जवळ जवळ सर्व साहित्यिकही साहित्य संघाशी जोडलेले होते. सर्व साहित्यिकांचे जीवनच संघमय झाले होते. "अखिल महाराष्ट्राची बुद्धिमत्ता, मुंबई मराठी साहित्य संघात एकवटली होती, असे म्हटले जात असे. आ० मर्ढेकर, माडखोलकर, अनंत काणेकर, के० ना० काळे, वा० रा० ढवळे, कधी कधी कुसुमाग्रज, आचार्य अत्रे, शिवाय गं० दे० खानोलकर, वि० स० खांडेकर, सौ० सुधाबाई व रा० भि० जोशी अशा सर्वांची पू० वि० ह० सरांच्या घरी नियमित वर्दळ असे. उर्दू कथालेखक श्री० कृष्णचंद्रही पू० वि० ह० सरांकडे एक दोनदा आले होते. (पू० रा० भि० जोशी सरांचा उर्दू भाषेचा व वाङ्ग्याचा उत्तम अभ्यास होता, हे नमूद करणे महत्त्वाचे आहे.) आर्थिक विवंचना, हा या सर्व विद्वद्वरांच्या आयुष्याचा, दैनंदिन जीवनाच्या नित्य कसोटीचा भाग होता. पण तरीही ह्या सर्वांचे एक अत्यंत महत्त्वाचे वैशिष्ट म्हणजे हे सर्व अनेकांचे जगणे स्वत:वर घेऊन जगणारे महाजन होते. २० व्या शतकाने त्यांना समग्रतेने जगणे शिकवले होते. ह्या सर्वांच्या जाणिवा व्यापक झाल्या होत्या. त्यामुळे आदर्शवत् जीवन जगणारे हे सर्व महाजन होते. ह्यांची नीतिमूल्येही श्रीरामायणाची नीतिमूल्ये साकारणारी होती. व्यक्तिगत व सामाजिक नीतिमूल्येही समान होती. समर्पित निष्ठेने मराठी वाङ्ग्याची सेवा करणे, त्याच निष्ठेने विद्यार्थी घडवणे, नवकथा, नवकविता, मराठी वाङ्ग्याच्या सर्व प्रकारांत होत असलेले अंतरंग-स्वरूप बदल, सहृदय समीक्षादृष्टीने हाताळणे आणि ह्या बदलांचे स्वागत करून त्यांना सातत्याने प्रोत्साहन देणे, हे सर्व पू० वि० ह० सर आणि त्यांचे विद्वद्वर स्नेहीजन, ह्या सर्वांचे स्वतः स्वीकारलेले भागधेय होते.

यशोहि तेषाम् महतां महीयताम् हाच सर्वांच्या श्रेष्ठत्वाचा गौरव.

पू० वि० ह० सरांचा स्वतःचा एम्० ए० पर्यंतचा विषय इंग्रजी वाङ्मय हा होता. त्यामुळे ते इंग्रजीचे प्राध्यापक असणे क्रमप्राप्त होते. इंग्रजी वाङ्मयाचा त्यांचा अभ्यास सशक्त व सखोल होता. शेक्सपिअर, बर्नार्ड शॉ हे तर त्यांच्या खास अभ्यासाचे विषय होते. पण तरीही मराठी भाषेशी आंतरिक निष्ठेने जोडलेल्या सरांनी; आमच्या सारख्या, संसाराची जबाबदारी सांभाळत, दीर्घकाळाने बी० ए०, एम० ए० करणाऱ्या विद्यार्थ्यांना त्यांनी अपत्यवत् मानले. आमच्या अडचणी जाणून घेतल्या. आमच्या मराठी व इंग्रजी भाषेच्या वाङ्मयाच्या अपुऱ्या अभ्यासाचे भान ठेवून, त्यांनी स्वतःचा व्यासंगपूर्ण अभ्यास सोपा — सुलभ करून शिकवला. आमच्यातल्या न्यूनगंडाची जाणीव पूर्णपणे पुसून टाकली आणि नव्या समृद्ध ज्ञानासह आणि ज्ञानदृष्टीसह, आत्मविश्वासाने जगात वावरायला समर्थ केले. (इथे विशेष महत्त्वाचे व वेगळे सांगायचे म्हणजे ते स्वत: मर्ढेकरांचे जेष्ठ अभ्यासक असूनही, त्यांनी मर्ढेकरांचा वेगळ्या समीक्षादृष्टीने विचार करणारे आदरणीय प्रा० धों० वि० देशपांडे सरांकडे अधिक अभ्यासाकरता पाठवले होते आणि पूज्य वि० दा० सावरकरांच्या 'भाषाशुद्धी-लिपिशुद्धी' चळवळीचा आणि त्यांच्या एकूण साहित्यिक योगदानाचा विशेष अभ्यास व्हावा म्हणून, आदरणीय डॉ० श्री० धनंजय कीर सर ह्यांच्याकडे पाठवले होते.)

पू० वि० ह० सरांच्या प्रतिभावान् विद्यार्थ्यांनी तर मराठी वाङ्मयक्षेत्रात आपले महत्त्वाचे योगदान दिले आहे. आदरणीय सौ० सुमती देवस्थळे ह्यांचे, 'कार्लमार्क्स — एक विचारवंत, 'टॉलस्टॉय', 'आल्बर्ट श्वाइट्झर', 'मॅक्सिम गार्की', 'सप्तर्षी आणि अरुंधती' (पाश्चात्त्य साहित्यिकांवर आधारित) हे वाङ्मय, आदरणीय पु० ल० देशपांडे (जे इस्माईल यूसुफ कॉलेजमध्ये, पू० वि० ह० सरांचे विद्यार्थी होते.) ह्यांच्या साहित्यिक कर्तृत्वाचे प्रेम व अभिमान सर्वच मराठी माणसांना आहे; (इथे एक वेगळा विशेष अधोरेखित करावयाचा मोह होतो आणि तो म्हणजे पू० वि० ह० सर आणि आ० पु० ल० देशपांडे ह्यांच्या विनोदातील साम्य ! दोघांचाही विनोद बुद्धिचातुर्यपूर्ण असून सरळ व निर्मळ असा होता. कुणाच्याही वर्मावर, व्यंगावर दूषणे देणारा बोचरा नव्हता. आदरणीय श्री० प्रभाकर पाध्ये ह्यांनी तर आपल्या पत्रातच लिहिले आहे, "त्यांनी मला मराठीत लिहायला शिकवले." मुंबई विद्यापीठाचे कुलगुरु डॉ० श्री० राम जोशी, हे पू० वि० ह० सरांचे रुईया महाविद्यालयातले' विद्यार्थी. त्यांची सन्मान्य योग्यता सर्वांना माहीत आहेच. गुरुवर्य प्रा० वा० ल० कुळकर्णी सरांनी, त्यांच्या गौरवग्रंथाच्या आत्मकथनात दोन-तीन ठिकाणी पू० वि० ह० सरांचा आदराने उल्लेख केला आहे. एके ठिकाणी ते लिहितात, "मर्ढेकरांची सौंदर्यमीमांसा हा माझा लेख, मर्ढेकरांचे त्यावेळचे स्नेही प्रो० वि० ह० कुळकर्णी ह्यांना वाचून दाखवून नंतरच प्रसिद्ध केला". (गुरुवर्य वा० ल० पृष्ठ-२९) पू० वि० ह० सरांच्या अगणित विद्यार्थ्यांपैकी ही काही महत्त्वाची उदाहरणे आहेत.

'प्रतिभा', 'ज्योत्स्ना' अशा महत्त्वाच्या मासिकांचे संपादकत्व पेलणारे, सातत्याने विविध प्रकारचे विपुल लिखाण करणारे, शॉ, शेक्सपिअर, अच्युत बळवंत कोल्हटकर, मर्ढेकर ह्यांच्यावर अधिकाराने लिहिणारे पू० वि० ह० सर ! त्यांची लेखणी पुढे का, कशी, कधी-कुठे मंदावली हा प्रश्न पू० रा० भि० जोशी सरांनी त्यांच्या लेखात उपस्थित केला होता आणि पुस्तकप्रकाशनाच्या दिवशी, व्यासपीठावरून गुरुवर्य डॉ० सौ० सरोजिनी वैद्यबाई ह्यांनी हाच प्रश्न उच्चारला होता. त्याचे उत्तर पू० वि० ह० सरांच्या कन्या सौ० इरावती कुळकर्णी ह्यांनी, "वाढत्या आर्थिक अडचणी, घरात सतत येणारे तसेच कुटुंबासह येऊन रहाणारे पाहुणे, वडिलोपार्जित कर्जाची फेड आणि कुणाही अडचणीत असणाऱ्या व्यक्तींनी आर्थिक मदतीची केलेली याचना, अशा स्थितीत अधिक पैसे मिळवायची निकड आणि त्याकरता दोनतीन ठिकाणी अध्यापनाची स्वीकारलेली जबाबदारी" असे दिले आहे. अर्थात परिणामत: थकलेले शरीर व मानसिक अस्वास्थ्य, ह्यामुळे पू० वि० ह० सरांची लेखणी विसावली असावी.

आपले हे पत्रांचे सादरीकरण म्हणजे अनेक मान्यवरांच्या आशीर्वादस्वरूप पत्रांचा धांडोळा आहे. त्यानिमित्ताने विसाव्या शतकातल्या पत्रव्यवहाचे स्वरूप बघणेही महत्त्वाचे आहे. "प्रज्ञा प्रभातसूर्य" असे आमचे श्री सदगुरू प० पू० श्री० गुळवणी महाराज आणि प० पू० श्री० दत्तमहाराज कवीश्वर, ह्यांच्या नित्य दिनक्रमात, साधकांच्या, भक्तांच्या किंवा अडचणीत असलेल्या त्रस्त जनांच्या पत्रांना स्वहस्ते उत्तर लिहून पाठवण्याकरता काही तास नेमलेले असत. हीच शिस्त सर्व अध्यापक वा प्राध्यापकांच्या दिनक्रमात असे. ह्या सर्व महापुरुषांचे दैनंदिन जीवन अतिशय शिस्त व नियमबद्ध, कुठेही कालापव्यय न करणारे आणि सदैव अनेकांची चिंता करणारे होते. बहुतांश पत्रे 'पोस्टकार्ड' वर लिहिली जात असत. काही थोडी पत्रे आंतरदेशीय निळ्या कागदावर लिहिलेली असायची. क्वचित एखादे पत्र आपली स्वतःची नाममुद्रा असलेल्या

कागदावरचे असायचे. अक्षर सुरेख, सुवाच्य, वळणदार, शुद्धलेखनाची एकही चूक नसलेले असायचे. पत्रावर दिनांक व पत्ता असायचाच. (१९७८ ते १९८५ ह्या वर्षांत, आम्ही पुण्यात 'दुदुंभी' नामक घरात रहात असताना, पू० वि० ह० सरांना लिहिलेल्या एका पत्रावर पत्ता लिहिला गेला नाही. पण सरांना तो माहीत होता. त्यांचे लागलीच पत्र आले " 'दुंदुभी' कुठून वाजते ते कळत नाही तरी पत्रावर पत्ता लिहिण्यास विसरू नये.")

आज ह्या पत्रसंग्रहासंदर्भात काहीसे भावनिक होताना आठवत आहे प्रा० अविनाश केळकरांचे पत्र. वृत्तपत्रात आठवणी पाठवण्याकरता केलेल्या विनंतीपत्रानंतर अक्षरशः तिसऱ्या दिवशी आलेले त्यांचे पहिले पत्र. त्यानंतर योग्य व विशेष सूचना करणारी त्यांची १२ पत्रे, पू० श्री० रा० भि० जोशी सर व सौ० सुधाबाई जोशी ह्यांची १० पत्रे, पू० वा० रा० ढवळे ह्यांची ७ पत्रे, पू० वि० ह० सरांची १८ पत्रे, पू० श्री० माधव मनोहर ह्यांची अत्यंत सुंदर व रेखीव अक्षरातील ४ पत्रे, पू० श्री० पां० वा० गाडगीळांची २ पत्रे, गुरुवर्य आ० व० दि० कुळकर्णी सरांची ७ पत्रे, डॉ० धनंजय कीरांची ८ पत्रे, गुरूवर्य कुळकर्णी सरांची ३ पत्रे, प्रभाकर पाध्ये ह्यांची ४ पत्रे, डॉ० रा० चिं० ढेरे, आ० मंगला बाई निगुडकर, आनंद साधले, पू० श्री० सोमण वकील आणि आ० पु० ल० अशा मानवरांची प्रत्येकी १ किंवा २ पत्रे. शिवाय गुरूवर्य डॉ० सौ० सरोजिनी वैद्यबाई आणि डॉ० उषाबाई देशमुख ह्यांची अनेक पत्रे. आज ही सर्व पत्रे म्हणजे एक अनमोल खजिना आहे.

ह्या श्रीगुरुपौर्णिमेच्या निमित्ताने, पू० वि० ह० सरांचे आणि सर्व गुरुजनांचे मोठेपण प्रकर्षाने व सतत जाणवत आहे. जर ह्या पुस्तकाचे प्रयोजन नसते तर एवढ्या महत्त्वाच्या मान्यवरांशी संबंध येण्याचे काहीच कारण नव्हतो. अपार व उदार अशा श्रीगुरुकृपेने लाभलेली ही सर्व पत्रसंपत्ती, श्रद्धापूर्वक जपून ठेवली होती गेली चाळीस वर्षे. (खरे तर २५ एक वर्षांपूर्वीच हे काम व्हायला पाहिजे होते. पण राहूनच गेले. 'क्षमस्व अपराधम्' एवढेच आता.) ह्यापुढे अधिक वेळ न घालवता ह्या पत्रसंग्रहाला कांही सुयोग्य व छानसे रूप द्यावे असे वाटू लागले आणि त्वरित भेटले श्री० सुशान्त देवळेकर, P.D.F. ची संकल्पना घेऊन ! श्री० सुशान्त देवळेकर हे सध्या 'राज्य मराठी विकास' संस्थेत, महत्त्वाच्या स्थानावर कार्यरत आहेत. (रुपारेल महाविद्यालयाच्या निवृत्त मराठी विभाग प्रमुख, डॉ० माधुरी प्रकाश पणशीकर ह्यांचे ते अभिमान वाटावे असे विद्यार्थी आहेत.) श्री० सुशान्त हे अतिशय बुद्धिमान प्रगल्भ अभ्यासक आणि समंजस शहाणपण असलेल व्यक्तित्त्व आहे. त्यांनी चि० सायली दशरथ — जी 'I. I. T.'त 'पी० एच० डी०' करीत आहे आणि चि० चैत्राली केळकर — तिने नुकतेच एम० ए० मराठी, उत्कृष्ट अशा ८४ टक्के मार्कांनी पूर्ण केले आहे, अशा दोन्ही बुद्धिमान् विद्यार्थिनींना मार्गदर्शन करीत आणि स्वतःचा सक्रिय सहभाग स्वीकारीत, पू० वि० ह० सरांच्या पुस्तकनिर्मितीच्या ह्या पत्रव्यवहाराला, सुंदर असे स्वरूप दिले आहे. सौ० नीलिमा कानडे ह्या माहीम सार्वजनिक वाचनालयातल्या कार्यक्षम व सद्गुणी ग्रंथालय-सहाय्यक असून त्यांनी टंकलेखनाचे काम अतिशय जलदगतीने केले आहे. ह्या चारही व्यक्तींकरता माझे मनापासून असे अनौपचारिक आभार व शुभेच्छा आहेतच. पण त्याहीपेक्षा पू० वि० ह० सरांचे कल्याणमय आशीर्वाद, त्यांना भविष्यकाळात निश्चितच फलदायी ठरणारे आहेत.

ही P.D.F. ची संकल्पना आकार घेऊ लागल्यावर, 'मनोगता'करता आठवण झाली श्री० जयंत कुळकर्णी ह्यांची — सरांच्या सुपुत्राची —त्यांनी अक्षरशः दोन दिवसात आपलं 'मनोगत' लिहून पाठवले. सरांच्या सुपुत्राशी — त्यांच्या कुटुंबाशी — आज असे जोडले जाताना झालेला आनंद शब्दातीत आहे आणि सौ० इरावती ताईंसह 'सर्व कुळकर्णीगृहाबद्दल' चिरस्वरूप कृतज्ञता आहे.

विद्यार्थ्यांच्या हिताची सदैव काळजी व पाठपुरावा करणाऱ्या, आम्हां सर्वांच्या आदरणीय आणि प्रिय अशा पू० देशमुखबाईंचा अधिकार तर सर्वार्थाने मोठा आहे. पू० वि० ह० सरांच्या 'अॅज यू लाइक हिम', ह्या पुस्तकनिर्मितीच्या काळातल्या आज त्या कदाचित एकमेव साक्षीदार आहेत. त्यांनी फक्त एका दिवसात आपले मनोगत स्वतः लिहून पाठवले. पू० बाईंच्या आजवरच्या न फिटता येणाऱ्या ऋणाबद्दल सदैव नतमस्तक होऊन नमस्कार अर्पण आहे.

श्री० अभय भावे! ह्या पुस्तकाचे प्रकाशक! आज पुनः त्यांचे आभार मानताना एवढे नक्कीच म्हणावसे वाटत आहे की त्यांच्या उत्स्फूर्त व जबाबदार सहकार्याशिवाय हे पुस्तक प्रत्यक्षात येणे कठीण होते. त्यांनी हसतमुखाने व तत्परतेने 'अॅज यू लाईक हिम'करता जे कष्ट घेतले, ते सदैव स्मरणात आहेत.

श्री० प्रकाश केणी ह्यांनी एका दिवसात (खरे तर काही तासांत) सुरेख मुखपृष्ठ करून दिले. त्यांचे मन:पूर्वक आभार

व त्यांना शुभेच्छा आहेत.

आज एकविसाव्या शतकाच्या पूर्वाधात असताना, मराठी भाषा व वाङ्मयाचे अवलोकन करणे सहज स्वाभाविक आहे. निरीक्षण असे सांगते की अनुवाद व भाषांतर हा साहित्यप्रकार अधिकाधिक समृद्ध होत चालला आहे आणि हे निश्चितच स्वागतार्ह आहे. सखोल अभ्यासपूर्वक लेखन करणारे साहित्यिक म्हणजे डॉ॰ सदानंद मोरे, आ॰ वीणा गवाणकर, डॉ॰ सुधीर रसाळ, डॉ॰ यू॰ म॰ पठाण, डॉ॰ दिलीप धोंगडे, अश्विनी धोंगडे असे महत्त्वाचे आहेत. काव्याचे दालन, काही सन्मान्य अपवाद सोडल्यास "तुझी दूरता त्याहूनी साहवे" असे आहे. विज्ञानविषयक लिखाण करणाऱ्या लेखकांचे विशेष अभिनंदन करणे महत्त्वाचे आहे. कारण मूळचे शास्त्रीय इंग्रजी किंवा तत्सम शब्द न वापरता संपूर्णतः मराठी शब्द वापरून किंवा नवे शब्द तयार करून लिहिणाऱ्या ह्या बुद्धिवंतांचे हे अतिशय स्तुत्य प्रयत्न आहेत. डॉ॰ माधव गाडगीळ (परिसर शास्त्रज्ञ) ह्यांचे 'वारूळ पुराण', 'उत्क्रांती : एक महानाट्य'; डॉ॰ आनंद जोशी (हृदयरोगतज्ज्ञ) ह्यांचे 'कर्करोग विज्ञान', 'मेंदूतला माणूस', 'व्यूहचक्र', तसेच डॉ॰ अंजली जोशी ('मी अल्बर्ट एलिस') श्री॰ शंतनु अभ्यंकराची बरीच पुस्तके महत्त्वाची आहेत. साहित्य, संस्कृती, वाङ्मयीन परंपरा, मनुष्यजीवन (विशेषतः स्त्रीजीवन) ह्यांचा सर्वांगीण विचार करून, उत्कृष्ट मराठी लिहिणाऱ्या डॉ॰ अरुणा ढेरे आणि त्यांच्या सारखे काही साहित्यिक! ह्या व अशा महत्त्वाच्या साहित्यिकांच्या आधारावरच, २१ व्या शतकातल्या 'मराठी भाषा व वाङ्मयाचे भविष्य' ह्यासंदर्भात आश्वासक विश्वास उभा आहे.

लौकिक जीवनव्यवहारात बोलली जाणारी मराठी भाषा, ह्याबद्दल न बोललेलेच बरे, अशी स्थिती आहे. जबरदस्त भाषिक अभिसरण आणि व्याकरणासह अपुऱ्या अर्धवट अभ्यासाने विकसित झालेली मराठी भाषा ह्यामुळे जाणकारांची वाढती अस्वस्थता, ही सद्यस्थिती आहे. 'वाचनसंस्कृती' सध्या वेगवेगळ्या माध्यमातून प्रवाहित होत आहे, हेही यंत्रयुगीन प्रभावातले प्रमुख सूत्र आहे. पण तरीही... मराठी भाषा व वाङ्मय ह्यांशिवाय एकूणच मनुष्य जीवनाची प्रेयस्-च्या दिशेने होणारी वाढती वाटचाल पाहून 'श्रेयस्' हळूहळू हरवत जाणार का असा प्रश्न ज्येष्ठांना अस्वस्थ करीत असतो, हेही सत्य आहे.

१३ वे शतक मराठी भाषेचा प्रारंभ काळ. ह्या शुभारंभीच प॰ पू॰ श्री॰ ज्ञानेश्वर महाराजांनी मराठी भाषेचा "वेलु गगनावेरी नेला". "शब्दांचे व्यापकपण देखिजे असाधारण" ह्याची पूर्ण जाणीव असलेल्या प॰ पू॰ श्री॰ तुकाराम महाराजांनी १७ व्या शतकात 'शब्द रत्नांचे धन' शर्थीने जिंकले. ह्या दोन महापुरूषांनी चराचर सृष्टीसह सर्व लौकिक जीवन आपल्या कवेत घेऊन, परमपुरूषाची उराउरी नित्यभेट घेण्याचा आपला अमृतानुभव आपल्या ग्रंथांतून प्रस्तुत केला. १३ व्या शतकापासूनच श्रीसंतांच्या मांदियाळीने, नंतर पंडित कवींनी शाहिरांनी, मराठी भाषेला सजवले, मराठी वाङ्मय समृद्ध केले. अनेक वेगवेगळी वळणे घेत असलेले मराठी गद्य-पद्य वाङ्मय, २० व्या शतकातही सुखावले आणि काहीसे विसावलेही !

प॰ पू॰ ज्ञानेश्वर तुकाराम महाराजांच्या 'मऱ्हाठी भाषेच्या पाऊलखुणा जाणीवपूर्वक जपणाऱ्या पू॰ वि॰ ह॰ सरांनी आणि सर्व गुरुजनांनी मराठी भाषेची निष्ठेने सेवा केली. 'असत्' मधून 'सत्' निर्माण होत नाही, हे सत्य जाणून हे सर्व गुरूजन 'सत्'च्या दिशेनेच मार्गस्थ झाले होते. (स्वतःच्या आयुष्यातही आणि वाङ्मयातही) आज श्रीगुरूपौर्णिमेच्या शुभमुहूर्तावर सकल गुरूजनांच्या तसेच माझे परम आदराचे श्रद्धास्थान म्हणजे माझे प॰ पू॰ मामंजी, सासूबाई — प्रा॰ प्र॰ वा॰ धारप आणि इंदुमती धारप तसेच माझे प॰ पू॰ आईवडील — डॉ॰ वि॰ ग॰ मंडलीक आणि विमलाबाई मंडलीक ह्यांच्या शुभचरणी श्रद्धेने — परम आदराने नतमस्तक होताना, त्यांनी येणाऱ्या अनेक शतकात 'मऱ्हाटी भाषेचे रूप' अबाधित राहील, वर्धिष्णु होईल, हाच आशीर्वाद द्यावा, ही नम्र विनंती.

॥ श्रीसद्गुरुचरणार्पणमस्तु ॥

नम्र
आशा किशोर धारप
२१/७/२०२४

# प्रा० वि० ह० कुळकर्णी यांच्या विद्यार्थिवर्गास आवाहन



मी सौ० आशा धारप प्रा० वि० ह० कुळकर्णी यांची रुईया कॉलेजातील एक विद्यार्थिनी. त्यांच्या घरीं एकदां गेलें असतां, आपण हल्ली ग० त्र्यं० माडखोलकर यांचे चरित्र लिहीत असल्याचे ते म्हणाले. मी म्हटलें, सर आपण आपले आत्मचरित्र कां लिहीत नाही? त्यावर ते म्हणाले की माझ्या चरित्रात लिहिण्यासारखे कांही नाही. माझ्या व इतरांच्या आठवणी मात्र खूप आहेत. त्यावर मी म्हटलें आपले विद्यार्थी तर असंख्य आहेत. त्यापैकी कित्येकांनी मला आपल्या अनेक आठवणी सांगितल्या होत्या परंतु त्याना आता कॉटॅक्ट करणार कसे. तेव्हां वृत्तपत्रांतून मी त्यांना असे आवाहन करीत आहे की त्यांनी आपल्या प्रा० वि० ह० कु० संबंधीच्या आठवणी मी खाली लिहीत असलेल्या पत्त्यावर पाठवाव्या त्यांच्या सहकारी प्राध्यापकांनीही व इतर निकटवर्ती परिचितांनी सुद्धा !

सौ० आशा धारप

# निमंत्रणपत्रिका



५ एप्रिल १९८३

॥ श्रीराम ॥

**संजय प्रकाशन**
९१७/२२, फर्ग्युसन कॉलेज रोड
पुणे ४११ ००४.

प्रा. वि. ह. कुळकर्णी. मराठीचे ज्येष्ठ साहित्यिक. इंग्लीशचे नामवंत प्राध्यापक. विद्यार्थ्यांवर अपत्यवत् प्रेम करणारे 'सर'. स्नेहीसोबत्यांचे जिव्हाळ्याचे 'विठ्ठलराव'. आप्तांचे प्रेमळ 'अण्णा' आणि 'माणूस' या संज्ञेवर अमित प्रेम करणारी सज्जन व्यक्ती. अशा आपल्या वि. ह.च्या आठवणींच्या पुस्तकाचे प्रकाशन मुंबई विद्यापीठाचे कुलगुरु प्रा. श्री. राम जोशी यांच्या हस्ते रविवार दि. १७ एप्रिल रोजी होणार आहे. प्रा. वि. ह. कुळकर्णी आज आपल्यात नाहीत ही अतीव दुःखाची गोष्ट आहे. तरी या प्रकाशनसमारंभाच्या रुपाने त्यांच्या स्मृतीला आदरांजली वहायला आपण सर्व नक्की याल हा उदंड विश्वास आहे व तशी नम्र विनंती ही आहे.

आपले नम्र,

**अभय शंकर भावे** **सौ. आशा किशोर धारप** **सौ. इरावती बा. कुळकर्णी**

**प्रकाशनाचे स्थळ – मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय सभागृह**

मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय मार्ग, नायगाव, दादर, मुंबई ४०० ०१४.

वेळ– रविवार, दि १७ एप्रिल १९८३. सायंकाळी ४ वाजता.



**'ॲज यू लाइक हिम'**
**प्रा. वि. ह. कुळकर्णी**
**यांच्या आठवणी**

**संजय प्रकाशन, पुणे ४.**

To,

पुस्तकप्रकाशनाच्या समारंभाची निमंत्रणपत्रिका

# राम जोशी



१२५ वे वर्ष

१८५७-१९८२

मुंबई-४०० ०३२.

दिनांक १५ मार्च, १९८२.

शतकोत्तर रौप्यमहोत्सवी वर्ष

सौ. आशा धारप यांस स.न.वि.वि.

तुमचे पत्र मिळाले. प्रा.वि.ह.कुळकर्णी यांच्या आठवणीच्या पुस्तकाचा प्रकाशन समारंभ रविवार दिनांक १० एप्रिल रोजी होणार असल्याचे वाचुन आनंद झाला. समारंभाची वेळ व जागा निश्चित झाल्यावर कळवावे.

कळावे,

आपला,

(राम जोशी)

सौ.आशा किशोर- धारप,<br>
दुंदुभी, २४, शैलेश सोसायटी,<br>
कर्वेनगर,<br>
गुळवणी महाराज पथ,<br>
पुणे २९.

राम जोशी ह्यांचे पत्र

शतकोत्तर रौप्य महोत्सवी वर्ष

सौ० आशा धारप यांस स० न० वि० वि०

तुमचे पत्र मिळाले. प्रा० वि० ह० कुळकर्णी यांच्या आठवणीच्या पुस्तकाचा प्रकाशन समारंभ रविवार दिनांक १७ एप्रिल रोजी होणार असल्याचे वाचुन आनंद झाला. समारंभाची वेळ व जागा निश्चित झाल्यावर कळवावे.

कळावे,

आपला,
(राम जोशी)

सौ० आशा किशोर धारप
दुंदुभी, २४, शैलेश सोसायटी,
कर्वेनगर,
गुळवणी महाराज पथ,
पुणे २९.

# अविनाश केळकर



सौ. आशा धारप ॥श्री॥ ८८ जयप्रकाश नगर,
यांस गोरेगाव, मुंबई
स.न.वि.वि. ४०००६३
आजच्या 'लोकसत्ता' दैनिकातील आपले ८-७-८०
पत्र वाचले. अत्यंत आनंद झाला. प्रा. विठ्ठलराव कुलकर्णी
यांचा महाविद्यालयातील मी विद्यार्थी नाही. परंतु ३४/३३
वर्षांपूर्वी साहित्य संघातर्फे प्राज्ञ-विशारद हे वाङ्मयीन वर्ग
चालत. त्या वर्गाचा मी त्यांचा एक विद्यार्थी आहे. माझ्या-
वर त्यांचे वाङ्मयीन संस्कार असून त्यांचा लोभही आहे. मी
त्यांच्या अच्युतराव कोल्हटकर चरित्र ग्रंथावर, गेल्या मे महि-
न्यात 'नवशक्ती'त परीक्षण लिहिले होते. त्यांची माझी भेट
होते व पत्रव्यवहारही चालू असतो. प्रा. विठ्ठलरावांनी गेल्या
१४ एप्रिलला ७८ वर्षे पूर्ण करून ७९ व्या वर्षात पदार्पण केले.
म्हणजे येत्या १४ एप्रिलला आपले
पुस्तक तयार व्हावे अशी अपेक्षा
आहे. मी माझ्या त्यांच्यासंबंधीच्या
आठवणी लवकरच पाठवीन. तसेच
आपण श्री प्रकाश मोहाडीकर,
डॉ. विठ्ठल प्रभु, कविवर्य प्रफुल्ल-
दत्त, प्रा. रा. शि. जोशी यांच्याशी
संपर्क साधून यांच्याही आठवणी
मिळवाव्यात. ही सर्व माणसे
विठ्ठलरावांच्यावर प्रेम करणारी
आहेत. प्रा. विठ्ठलराव कुलकर्णी हे
हाडाचे प्राध्यापक आहेत.
कळावे, आपला, अविनाश केळकर

अविनाश केळकर ह्यांचे पत्र क्र० ०१

आवाहनानंतर तिसऱ्याच दिवशी आलेले पहिले पत्र.

॥ श्री ॥

९९ जयप्रकाश नगर,
गोरेगाव, मुंबई ४०००६३

सौ० आशा धारप
यांस
स० न० वि० वि०

आजच्या 'लोकसत्ता' दैनिकातील आपले ८-७-८० पत्र वाचले. अत्यंत आनंद झाला. प्रा० विठ्ठलराव कुलकर्णी यांचा महाविद्यालयातील मी विद्यार्थी नाही. परंतु ३२/३३ वर्षापूर्वी साहित्य संघातर्फे प्राज्ञ-विशारद हे वाङ्मयीन वर्ग चालत. त्या वर्गाचा मी त्यांचा एक विद्यार्थी आहे. माझ्यावर त्यांचे वाङ्मयीन संस्कार असून त्यांचा लोभही आहे. त्यांच्या अच्युतराव कोल्हटकर चरित्र ग्रंथावर गेल्या मे महिन्यात 'नवशक्ती'त परीक्षण लिहिले होते. त्यांची माझी भेट होते व पत्रव्यवहारही चालू असतो. प्रा० विठ्ठलरावांनी गेल्या १४ एप्रिलला ७८ वर्षे पूर्ण करून ७९ व्या वर्षात पदार्पण केले. म्हणजे येत्या १४ एप्रिलला आपले पुस्तक तयार व्हावे अशी अपेक्षा आहे. मी माझ्या त्यांच्यासंबंधीच्या आठवणी लवकरच पाठवीन. तसेच आपण श्री प्रकाश मोहाडीकर, डॉ० विठ्ठल प्रभू, कविवर्य प्रफुल्ल दत्त, प्रा० रा० भि० जोशी यांच्याशी संपर्क साधून त्यांच्याही आठवणी मिळवाव्यात. ही सर्व माणसे विठ्ठलरावांच्यावर प्रेम करणारी आहेत. प्रा० विठ्ठलराव कुळकर्णी हे हाडाचे प्राध्यापक आहेत.

कळावे, आपला,

अविनाश केळकर



॥श्री॥

८८ जयप्रकाश नगर,
गोरेगाव, मुंबई ४०००६३

सौ. आशा धारप
यांस स.न.वि.वि.

आपले प्रा. वि.ह. कुलकर्णी यांच्या आठवणी ०।७।८०
संबंधी 'लोकसत्ता' मध्ये पत्र प्रसिद्ध होताच एक पत्र पाठविले. त्यात आठवणी कुणाकडून मिळतील याची माहिती दिली आहे. त्यात खालील व्यक्तींचा निर्देश राहून गेला. त्यांची नावे खालील आहेत. (१) प्रभाकर पाध्ये (२) वा. रा. ढवळे (३) अरविंद तात्के (४) सौ. सुमती देवस्थळे (५) सौ. गिरिजा कीर (६) प्रा. मं. वि. राजाध्यक्ष. तरी या माणसांशी पत्रे पाठवून संपर्क साधणे.

आपण प्रा. विठ्ठलराव कुलकर्णी यांच्या आठवणी प्रसिद्ध करीत आहात हे ऐकून खूप आनंद झाला. त्यांच्या आठवणी मिळविणे अवघड नाही. आपल्याला माझी मदत हवी असल्यास संकोच न करता कळवावे.

आपल्या कार्यात मी सुयश चिंतितो. प्रा. विठ्ठलरावांनी ज्यांच्यावर संस्कार केले व जी माणसे त्यांना मानतात त्यांपैकी मी एक आहे.

पत्र आल्यावर कळवावे.

आपला,
अविनाश केळकर

अविनाश केळकर ह्यांचे पत्र क्र० ०२

॥ श्री ॥

९९ जयप्रकाश नगर,<br>
गोरेगाव, मुंबई ४०००६३<br>
१०| ७ | ८०

सौ० आशा धारप<br>
यांस स० न० वि० वि०

आपले प्रा० वि० ह० कुळकर्णी यांच्या आठवणी संबंधी 'लोकसत्ता' मध्ये पत्र प्रसिद्ध होताच एक पत्र पाठविले. त्यात आठवणी कुणाकडून मिळतील याची माहिती दिली आहे. त्यात खालील व्यक्तींचा निर्देश राहून गेला. त्यांची नावे कळवीत आहे. (१) प्रभाकर पाध्ये (२) वा० रा० ढवळे (३) अरविंद ताटके (४) सौ० सुमती देवस्थळे (५) सौ० गिरीजा कीर (६) प्रा० मं० वि० राजाध्यक्ष. तरी या माणसांशी पत्रे पाठवून संपर्क साधणे.

आपण प्रा० विठ्ठलराव कुळकर्णी यांच्या आठवणी प्रसिद्ध करीत आहात हे ऐकून खूप आनंद झाला. त्यांच्या आठवणी मिळविणे अवघड नाही. आपल्याला माझी मदत हवी असल्यास संकोच न करता कळवावे.

आपल्या कार्यात मी सुयश चिंतितो. आ० विठ्ठलरावांनी ज्यांच्यावर संस्कार केले व जी माणसे त्यांना मानतात त्यापैकी मी एक आहे. पत्र यावे.

कळावे.

आपला,<br>
अविनाश केळकर

# वा० ल० कुळकर्णी



वा० ल० कुळकर्णी ह्यांचे पत्र क्र० ०१

साहित्य सहवास<br>मुंबई ४००,०५१

श्री.

20. 6. 1982

सप्रेम आशीर्वाद वि०

पत्र मिळाले. थोडाफार मजकूर लिहिला आहे. तो पुरा करण्याचा प्रयत्न करतो. मात्र पुढच्या आठवड्यात कोणीतरी येऊन तो नीट नकलून घ्यावा. माझे अक्षर या पत्रापुरते बरे दिसले तरी हस्तलिखितात न लागण्यासारखे आहे. कळावे
घरातील सर्वांना नमस्कार.

आपला<br>वा० ल० कुळकर्णी



श्री

साहित्य सहवास
मुंबई ४००,०५१
१.९.८२

स० आशीर्वाद वि.

काल आपण प्रस्तावनेचा मजकूर नेला त्यात थोडी सुधारणा एका वाक्यापुरती करायची आहे. प्रारंभाच्या परिच्छेदात मी के. ना. काळे व वि. ह. कु. यांचेसंबंधी म्हटले आहे: "दोघेही ---- संपादक, इंग्रजी वाङ्मयाचे अभ्यासक". तेथे अशी सुधारणा करा: "मराठीबरोबर इंग्रजी वाङ्मयाचेही अभ्यासक". आपल्या सर्व कुटुंबियांना नमस्कार.

आ
वा. ल. कुळकर्णी

वा० ल० कुळकर्णी ह्यांचे पत्र क्र० ०२

साहित्य सहवास
मुंबई ४००,०५१
१. ९. ८२

श्री

स० आशीर्वाद वि०

काल आपण प्रस्तावनेचा मजकूर नेला त्यात थोडी सुधारणा एका वाक्यापुरती करायची आहे.

प्रारंभाच्या परिच्छेदात मी के० ना० काळे व वि० ह० कु० यांचेसंबंधी म्हटले आहे : “दोघेही....संपादक, इंग्रजी वाङ्मयाचे अभ्यासक”. तेथे अशा सुधारणा करा : “मराठीबरोबर इंग्रजी वाङ्मयाचेही अभ्यासक”.

आपल्या सर्व कुटुंबियांना नमस्कार.

आ
वा० ल० कुळकर्णी

# रा॰ भि॰ जोशी



२ "संपूर्णा"
साहित्य सहवास
वांद्रे (पूर्व). मुंबई ४०००५१
२८.११.८०

प्रो. आशा धारप यांस,

स. न. वि. वि. [illegible] २० नोव्हेंबरचे पत्र [illegible]

[illegible]

प्रयत्न करीन.

[illegible]

रा. भि. जोशी

प्रो. आशा [illegible]
[illegible] २४
कर्वे नगर
[illegible]
पुणे

रा॰ भि॰ जोशी ह्यांचे पत्र क्र॰ ०१

2 “झपूर्झा”

साहित्य सहवास

वांद्रे (पूर्व). मुंबई 400051

२७. ११. ८०

सौ॰ आशा धारप यांस

स॰ न॰ वि॰ वि॰

तुमचे २० ऑक्टोबरचे पत्र आल्यास बरेच दिवस झाले. उत्तराला मात्र फार विलंब होत असल्याबद्दल दिलगीर आहे.

इतका दीर्घ आणि इतका सततचा ज्यांच्याशी स्नेह-संबंध आहे त्याच्या संबंधीच्या आठवणी निवडून काढणें फार कठीण असतें असा माझा अनुभव आहे. तथापि मी प्रयत्न करीन.

मध्यंतरी विठ्ठलरावांची एकदां भेट झाली होती पण ह्या विषयासंबंधीं बोलणें शक्य झाले नाही. तुम्ही सर्व खुशाल असालच.

कळावे,

तुमचा,

रा॰ भि॰ जोशी



रा. भि. जोशी

सुधाबाई जोशी.

रा० भि० जोशी ह्यांचे पत्र क्र० ०२

R. B. Joshi

M.A.

2, 'Zapoorza', Sahitya Sahavas

Bandra (East), Bombay,400 051

Tele : 54 60 60

23. 4. 1983

श्री० सौ० आशा धारप यांस,

अनेक उत्तम आशीर्वाद. गेल्या रविवारच्या समारंभानंतर लगेचच पत्र पाठवणार होतो. पण पुस्तक आल्यावर लिहावे असा विचार करून थांबलो. पुस्तकाच्या प्रती अजून तयार झाल्या नसाव्यात असे दिसते. म्हणूनच अधिक न थांबतां लिहीत आहे.

समारंभ नेटका, रेखीव आणि उत्तम झाला असे आम्हांला तर वाटलेच. पण त्यानंतर जे जे भेटले त्यांनीही तसेच सांगितले. इरावतींच्या मनात भावना किती दाटून आल्या असतील? पण तिने अत्यंत संयमाने मुद्देसूद भाषण केले. तुमचीही दोन्ही भाषणे चांगली झाली. सर्वांनी जाण्यापूर्वी चहा घ्यावा ही सूचना तुम्ही शेवटी ज्या पद्धतींने केलीत तीं अतिशय उचित आणि मार्मिक होती. पुस्तक प्रकाशित झालें आणि समारंभही आंखल्याप्रमाणे पार पडला हें पाहून तुम्हांलाही कृतार्थ वाटलें असेल. तुम्हांला आम्ही यापूर्वी पाहिले नव्हते. या समारंभांत तुमचे सौजन्य, संयम आणि गुरुभक्ती तर दिसलीच पण तुमच्या व्यक्तिमत्त्वांत करारीपणाचही छटा असल्याचे जाणवले.

या पुस्तकाच्या निमित्ताने तुमच्याशी जो पत्रव्यवहार झाला त्यावरून तुम्हीं बी० ए० च्या पुढे शिकलां असाल कीं नाही किती शिकलां असाल यांची कल्पना आली नाही. इतकें तुम्हीं स्वतःला मागे ठेवले होते. समारंभाच्या वेळी काही लोकांकडून कळले कीं तुम्ही एम० ए० झाल्या आहां, काहीं दिवस शाळेत शिकवलेही आहे, आणि आतां पीएच० डी० साठीं अभ्यास करीत आहां. ऐकून फार आनंद वाटला. तुमच्या अंगीकृत कार्यांत तुम्हाला उत्तम यश येवों असें आम्हीं दोघेही मनापासून इच्छितो.

घाईघाईने का होईना पण श्री० धारपांची ओळख झाली त्यामुळे आनंद वाटला. त्यांना, तसेच त्यांच्या मातु:श्रीना आमचा नमस्कार सांगावा.

पुन्हा जेव्हा मुंबईला याल तेव्हा वेळात वेळ काढून भेटलांत तर आनंद वाटेल.

कळावे. हे आशीर्वाद

तुमचे

रा० भि० जोशी

सुधाबाई जोशी



रा० भि० जोशी ह्यांचे पत्र क्र० ०३

रा० भि० जोशी ॥२ झपूर्झा, साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१ टेलिफोन ५४६०६०

25. 6. 83

श्री० सौ० आशाताईस,

स० न० वि० वि० पत्र लिहिण्यास थोडा उशीर होत आहे. काही दिवसांपूर्वीच आधी माझी आणि सौ० सुधाबाईंची अशा आमच्या दोघांच्याही “ॲज यू लाइक हिम”च्या प्रती आल्या. लेखकांकडे प्रती जायला फार उशीर होत आहे हे पाहून तुम्हांला किती अवघड वाटले असेल याची कल्पना येऊ शकते. आतां बहुतेक लेखकांना प्रती मिळाल्या असतील. या आठवणी संपादित-प्रकाशित करून तुम्ही गुरुऋण फेडले आहेतच पण त्यांचे स्मारकच उभे केले आहे.

श्री० धारपांना आणि त्यांच्या मातुःश्रींना नमस्कार सांगावा. सौ० सुधाबाईंचा तुम्हांला नमस्कार.

कळावे. लोभ असावा.

तुमचा

रा० भि० जोशी

# द० गो० सोमण


श्री
चिपळूण
सप्रेम नमस्कार। १२।११।८०

आपले पत्र आजच मिळाले. श्री. वि. ह. कुळकर्णी व मी लहानपणचे बालमित्र. विठ्ठलराव हे माझे घरकंपौंडाला लागून २ पावलावर राहात होते. आपण लोकसत्तेत विठ्ठलरावांच्या आठवणी पाठविण्याबद्दल विनंती केली होती. ती प्रामुख्याने विठ्ठलरावांच्या धामवृंदाला अनुलक्षून होती. त्याबद्दल विठ्ठलरावांचे अभिनंदन करून लोच मी विचारणा केली होती की आमचे चार दोन आत मावतील काही त्यावेळी त्यांनी हो म्हणून सांगितले होते. परंतु माझ्या कामामुळे मला सवड झाली नाही. माझ्या नाती college मध्ये आहेत. त्या दिवाळी सुटीत घरी गेल्या असल्यामुळे तातडीने मला आठवणी पाठविता येत नाहीत. त्या आल्या म्हणजे शक्य तो लवकर काही थोड्या आठवणी विठ्ठलरावांकडे पाठवीन. त्यांना त्या पसंत पडल्या तर ते तुमचेकडे देतील. अर्थात इंग्रजी शाळेतील बालपणच्या आठवणी त्या मोठ्या महत्त्वाच्या असतील असे नाही. आपण पत्र लिहिल्याबद्दल अत्यंत आभारी आहे. कळावे. लोभाची वृद्धी व्हावी. आ.

डी. जी. सोमण
(वकील)

प्रति
प्रो. आशा किशोर धारप
द्वारा, २४ सौदामिनी सोसायटी
कै. गुळवणी महाराज पथ,
कर्वे नगर, पुणे २९.

पिन PIN

द० गो० सोमण ह्यांचे पत्र क्र ०१

॥ श्री ॥

चिपळूण
१२/११/८०

सप्रेम नमस्कार!

आपले पत्र आजच मिळाले. श्री० वि० ह० कुळकर्णी व मी लहानपणचे बालमित्र. विठ्ठलराव हे माझे घरकंपौंडाला लागून २ पावलावर राहात होते. आपण लोकसत्तेत विठ्ठलरावांच्या आठवणी पाठविणेबद्दल विनंती केली होतीत. ती प्रामुख्याने विठ्ठलरावाच्या छात्रवृंदाला अनुलक्षुन होती. त्याबद्दल विठ्ठरावांचे अभिनंदन करून लगेच मी विचारणा केली होती की आमचे चार दाणे आत मावतील का? त्यावेळी त्यांनी हो म्हणून सांगितले होते. परंतु माझ्या कामामुळे मला सवड झाली नाही. माझ्या नाती college मध्ये आहेत. त्या दिवाळी सुट्टीला घरी गेल्या असल्यामुळे ताबडतोब मला आठवणी पाठविता येत नाहीत. त्या आल्या म्हणजे शक्यतो लवकर काही थोड्या आठवणी विठ्ठलरावांकडे पाठवीन. त्यांना त्या पसंत पडल्या तर ते तुमचेकडे देतील. अर्थात इंग्रजी शाळेतील बालपणच्या आठवणी ह्या मोठ्या महत्वाच्या असतील असे नाही. आपण पत्र लिहिल्याबद्दल अत्यंत आभारी आहे. कळावे.

लोभाची वृद्धी व्हावी.

आपला
डी० जी० सोमण
(वकील)

श्री

चिपळूण[1]
२६।१२।८०

सौ० आशाताई यांस

सप्रेम न०

आपले गुरुजी प्रा० कुळकर्णी यांच्या लहानपणाच्या पांच आठवणी मी विठ्ठलराव यांजकडे पाठविल्या आहेत. पुर्वी लिहिल्यांप्रो आपणांकडे प्रथम पाठविल्या नाहींत. विठ्ठलराव यांजकडे पाठविल्या. त्या आठवणी त्यांना पसंत पडल्या असल्या तर ते तुम्हांला दाखवतील. पसंत नसल्यास कोणालाही दाखवू नये - असे त्यांना लिहीले होते. कुळकर्णी यांचे पत्र आठवणी पोचल्याचे आले आहे तरी जरूर तर आपण तपास करणे. कळावें

डी० जी० सोमण
वकील

[1]अक्षर लागत नाही.

# माधव मनोहर



माधव मनोहर ह्यांचे पत्र क्र० ०१

शिवाजी पार्क रस्ता ३<br>मुंबई २८. दि० २८।१०

सौ० आशा धारप यासी

सप्रेम नमस्कार वि०

दि० २६/१० चे आपले कृपापत्र वेळीच मिळाले. आभारी आहे. माझे ज्येष्ठ स्नेही श्री० विठ्ठलराव कुलकर्णी यांच्या आठवणींचा संग्रह आता लगेच पुस्तकरूपात प्रसिद्ध करणार आहात काय? तसे असल्यास नोव्हेंबर २० पर्यंत काही आठवणी लिहून पाठवतो. पत्रोत्तर अवश्य यावे, अशी अपेक्षा आहे.

कळावे.

आपला<br>माधव मनोहर





माधव मनोहर ह्यांचे पत्र क्र० ०२

शिवाजी पार्क रस्ता ३

मुंबई ४०० ०२८

दि ३० मे १९८३

सप्रेम नमस्कार० वि०

दि० ९/५ चे आपले कृतज्ञतापत्र वेळीच मिळाले होते. आपण विठ्ठलरांवाच्या स्मरणार्थ जे काय केले, ते शब्दातीत आहे. आपल्या पत्राचे उत्तर म्हणून जे काय लिहिणार होतो, ते पुस्तक वाचूनच लिहावे, असे योजिले होते. आपण आपल्या पत्रात म्हटले होते की —'गेल्या आठवड्यात प्रकाशकांना पुस्तक पोष्टाने पाठवायला सांगितले' —म्हणजे पुस्तक पाठवायला सांगून एक महिना उलटला. पण या महिनाभरात प्रकाशकांना पुस्तक पाठवायला सवड मिळालेली दिसत नाही. तेव्हा आता कृपा करून प्रकाशकांना स्मरण द्यावे व ते आता तरी पुस्तक पाठवतील, याविषयी जातीने लक्ष द्यावे. पुस्तक वाचण्यासाठी मी उत्सुक आहे. तेव्हा आता हे काम विनाविलंब करणार का? आपल्या मागे हे आणखी एक काम लावून देत आहे. तसदीबद्दल क्षमा करावी. कळावे.

आपला

माधव मनोहर

# वा॰ रा॰ ढवळे



वा. रा. ढवळे

दूरध्वनी : २९ ५६ ८१

१२६ डी. फणसवाडी, मुंबई – ४०० ००२.

दि० १८ - ७ - १९८२

सप्रेम नमस्कार.

आपला. वा.रा. ढवळे.

वा॰ रा॰ ढवळे ह्यांचे पत्र क्र॰ ०१

वा० रा० ढवळे

दूरध्वनी : २९ ५६ ८१ १२६ डी. फणसवाडी, मुंबई —४०० ००२

दि० १९ - ७ - १९८२

सप्रेम नमस्कार.

तुम्ही येथे आलां असता माझ्याशी दूरध्वनीवरून विठ्ठलरावांकडून त्या दिवशीं बोललांत व मला प्रा० वि० ह० कुळकर्णी यांच्या आठवणी पाठविण्याची आठवण करून दिलीत, हे फार चांगले झाले. कारण त्याच्या आदल्या दिवशीच माझे अन्य लेखन संपले होते. त्यामुळेच मी आठवणी लिहू शकलो. त्यांचे हस्तलिखित येत्या दोन तीन दिवसांत टपालाने पाठवून देत आहे.

श्री० विठ्ठलरावांचा नि माझा तसा गेल्या ५० वर्षांचा स्नेह. त्यामुळे त्यांच्या संबंधी मनात पुष्कळ आठवणी जाग्या होतात. पण आठवण म्हटली की त्यांच्या स्वभावावर नेमका प्रकाश टाकील असा प्रसंग हुबेहुब उभा करणारी लेखन शैली. प्रसंग आठवतात पण त्यावेळी विठ्ठलराव जे शब्द बोलले व श्रोत्यांत खसखस पिकली ते शब्द नेमके आठवत नाहीत.

असो. पण एक दोन आठवणी लिहिल्या आहेत त्यांवरून विठ्ठल रावांच्या भाषण पद्धतीची व उपरोधपूर्ण विनोदाची कल्पना यावी. असो.

जे गेल्या सबंध वर्षात लिहून झाले नाही ते आता लिहून झाले हा एक योगायोगच म्हटला पाहिजे. दिलेल्या वचनातून मी मुक्त होत आहे. मुद्रिते नीट तपासली जातील याची काळजी घ्यालच. कळावे.

आपला

वा० रा० ढवळे

सौ० आशा धारप ही पुस्तक-प्रकाशनाच्या कार्यासाठी आपल्या आई-वडिलांकडे दादरला आली असेल या समजुतीने मी तिच्या पुण्याच्या पत्त्यावर स्वतंत्र पत्र लिहिलें नाही. हें पत्र तिला दाखवावे. वा० रा०

वा० रा० ढवळे

---

दूरध्वनी : २९ ५६ ८१ १२६ डी. फणसवाडी, मुंबई —४०० ००२

दि० ९ एप्रिल १९८३

सप्रेम आशीर्वाद वि० वि०

आपले निमंत्रण मिळाले. माझे ज्येष्ठ स्नेही कै० वि० ह० कुळकर्णी ऊर्फ अण्णा यांच्या संबंधीच्या आठवणींचे पुस्तक As you like him या नांवाचे पुस्तक मुंबई विद्यापीठाचे कुलगुरु प्राचार्य राम जोशी यांच्या हस्ते रविवार दि० १७ एप्रिल ८३ रोजी प्रसिद्ध व प्रकाशित होणार आहे, हें समजले. विठ्ठलराव अमेरिकेत आपल्या मुलांकडे राहावयास गेले व तेथें गेल्यावर पंधरा दिवसांच्या आंतच निधन पावले ! आतां त्यांच्या आठवणीच मागें राहिल्या आहेत ! या पार्श्वभूमीवरून पाहतां त्यांच्या आठवणी सौ० आशा धारप या त्यांच्या एका निष्ठावंत विद्यार्थिनीने संपादित केल्या आहेत व ते पुस्तक आता प्रसिद्ध होत आहे. अशा पुस्तकाचे स्वागत करणे हें मी माझे एक कर्तव्य समजतो.

या प्रकाशन-समारंभास उपस्थित राहावयास मला आनंदच वाटला असता. पण ग्रंथसंग्रहालयाचे दोन जिने-दोन जिने चढणे माझ्या आजच्या प्रकृतीच्या दृष्टीने कठीण आहे. त्यामुळे येण्याची उत्कट इच्छा असूनही मी येऊं शकत नाही याचे दुःख होते. प्राचार्य राम जोशी हे एका वेळी विठ्ठरावांचे रुईया कॉलेजमध्ये सहकारी होते. त्यांच्यासारखा आजचा आघाडीचा वक्ता व विचारवंत प्रकाशन समारंभाला अध्यक्ष लाभावा याचा मला विशेष आनंद नि अभिमान वाटतो. प्रकाशन-समारंभ यशस्वी होईल याबद्दल मला शंका नाही. केवळ उपचार म्हणून मी समारंभास सुयश चिंतितो. कळावे. तुझ्या यजमानांना नमस्कार सांगावे.

आपला वा० रा० ढवळे

# प्रकाश मोहाडीकर



साने गुरुजी कथामाला
साने गुरुजी विद्यालय, भिकोबा पाठारे मार्ग,
दादर, मुंबई ४०००२८. दूर. ४५५९६१

जा. क्र. दि. ७।४।१९८९

सप्रेम नमस्कार.

आपले पत्र मिळाले.

मी अंदाजे २ महिन्यापूर्वीच डॉ. वि. द. कुलकर्णी यांच्याकडे माझा लेख पाठविला आहे.

आपली चिकाटी व त्यांच्याबद्दलची आदरबुद्धी यात कसर होत नसल्याने हे फार उपयुक्त कार्य आपल्या हातून निश्चित पार पडेल अशी खात्री वाटते.

मी आपल्या या सत्कार्यात आपल्या [illegible]



सुयश चिंतितो.

कळावे.

आ. नम्र
प्र. मोहाडीकर

ता. क. - आपल्या पत्रावर आपला पत्ता टाकला नव्हता. आपला पत्ता श्री. वि. द. कुलकर्णी यांजकडून आताच मिळाला म्हणून पोस्टाने पत्र टाकण्यास उशीर झाला.

POST CARD

सौ. आशा किशोर धारप
११ उदयगिरी,
२८ प्रो. [illegible] सोसायटी,
[illegible] नगर,
पुणे ४११००४

प्रकाश मोहाडीकर ह्यांचे पत्र

साने गुरुजी कथामाला
साने गुरुजी विद्यालय, भिकोबा पाठारे मार्ग,
दादर, मुंबई ४०००२८. दूर० ४५५९६९

जा० क्र० ७|४|१९८१

सप्रेम नमस्कार आपले पत्र मिळाले. मी अंदाजे २ महिन्यापूर्वीच प्रा० वि० ह० कुळकर्णी यांच्याकडे माझा लेख पाठविला आहे. आपली चिकाटी व त्यांतूनच प्रा० वि० ह० यांच्याबद्दलची आदरबुद्धी यात प्रगट होत असल्याने हे फार उपयुक्त कार्य आपल्या हातून निश्चित पार पडेल अशी खात्री वाटते. मी आपल्या या सत्कार्यात आपणास सुयश चिंतितो.

कळावे,

आ० नम्र
प्रकाश मोहाडीकर

ता० क० — आपल्या पत्रावर आपण पत्ता टाकला नव्हता. आपला पत्ता श्री० वि० ह० कुळकर्णी याजकडून आताच मिळाला म्हणून पोस्टांत पत्र टाकण्यास उशीर झाला.

# धनंजय कीर



मुंबई, १७-१-१९८३

प्रिय सौ. आशा किशोर धारपुरेंसी-

आपले दि. १३ जानेवारी १९८३ चे पत्र पावले. खूप दिवसांनी पत्र लिहिलेत ते प्रसंग पाहून. अगोदर नाही. माझे डोळे बिघडले, त्यांवर शस्त्रक्रियाही झाली. आता माझे डोळे ठीक झाले आहेत. काळजी नसावी. 'लोकहितकर्ते बाबासाहेब खेर' या माझ्या चरित्राला सरकारी पुरस्कार मिळाला त्याबद्दल आनंद व्यक्त करण्यासाठी आपण सर्व कुटुंबाच्या वतीने पत्र लिहिलेत ते वाचून अतिशय आनंद झाला.

पण आपल्या मुलीचा विवाह झाला तेव्हा पत्र आपण का लिहिले नाही हे मला समजत नाही. कदाचित त्यावेळी मी जास्त आजारी असेन किंवा गावात नसेन ही अशी आपणास शंका आली असावी असे माझ्या मनाला शंका चाटून गेली

प्रा. कि. ह. कुलकर्णी यांच्या आठवणी हा ग्रंथ छापून झाला की मी तो विकत घेईन. मला शिवाजी विद्यापीठाने डी.लिट. 12-12-80 रोजी दिल्यावर आमच्या [illegible] ग्रंथसंग्रहालयाने माझा सत्कार केला. त्याचे प्रा. कुलकर्णी हे अध्यक्ष होते. मी काही कारणांमुळे खाली उतरलो. जरा होतो. नितनंतर ते आले व म्हणाले, 'अहो कीर, तुमची पुस्तके पाहण्यास मी येत आहे. येऊ का?' मी म्हटले, 'चला!' ते जिना चढून वर आले व मला म्हणाले, 'तुमच्या सभोवती पुस्तकेच पुस्तके असतात असे मी वाचले होते. म्हणून म्हटले अगदी पहावं तुमचे वाचनालय.' त्यांनी खोलीला लावलेली कपाटे पाहिली, खालीवरच्या पाच रॅका पाहिल्या, कपाटे पाहिली, मी बाजारभर बसतो ते कपाटवजा बाक ग्रंथांनी भरलेले पाहिले आणि पुढे दारावर लावलेल्या फळ्या पुस्तकांनी नि वह्यांनी भरलेल्या पाहिल्या तेव्हा ते आश्चर्यचकित होऊन गेले व मला म्हणाले, 'किरसाहेब, तुम्ही पुस्तकात राहता?' त्यापूर्वी पाचसहा वर्षांपूर्वी एक गोष्ट घडली होती. त्यांची स्वाक्षरी घेईना की माझी इंग्रजी चरित्रे संपतात ही. मी त्यांना म्हणालो, 'अहो दुसरी, तिसरी, चौथी

धनंजय कीर ह्यांचे पत्र क्र० १.१



आपणाशी काही लिहीत. तेव्हा ते गप्प बसले. ~~[illegible]~~ आम्ही
'रवींद्र' मध्ये रवींद्रनाथांच्या व्याख्यानास जात होतो तेव्हा.

ते मोठे नावाजलेले प्राध्यापक होते. त्यांचे शिष्य अनेक
होते. ते त्यांना मानीत असत.

आता आम्ही सुखरूप आहोत. या वयात कुरकुर
असायचीच. त्याला तयार असले पाहिजे. मला डोके [illegible]
हे माझे म्हातारपणातले सुख. नाहीतर जगून उपयोग नव्हता.
[illegible] आत्महत्या होत एक उपयोगी ठरला असता. पण
तशी वेळ माझ्यावर आली नाही. सौ. सुधावहिनी आता
बरी आहे. आपली आठवण होते. मुंबईचे कार्यक्रम नाकारतो
कारण मला ते गाव झेपणार नाही.

आपली आम्ही वाट पाहात आहोत. अवश्य यावे.
जेवावयास यावे. श्री किशोर पं. तांना सुद्धा आणावे.
मुलीचा विवाह कोणाशी झाला? श्री सुखरूप असेल आम्ही
आशा करतो.

आपण उभयतांनी यावे अशी नम्र विनंती आहे.

१२-८०

आपला नम्र,
धनंजय कीर

धनंजय कीर ह्यांचे पत्र क्र० १.२

मुंबअी, १७-१-१९८३

प्रिय सौ० आशा किशोर धारप यांसी -

आपले दि. १३ जानेवारी १९८३ चे पत्र पावले. खूप दिवसांनी पत्र लिहिलेत ते प्रसंग पाहून. अगोदर नाही. माझे डोळे बिघडले, त्यांवर शस्त्रक्रियाही झाली. आता माझे डोळे ठीक झाले आहेत. काळजी नसावी. 'लोकहितकर्ते बाबासाहेब बोले' या माझ्या चरित्राला सरकारी पुरस्कार मिळाला त्याबद्दल आनंद व्यक्त करण्यासाठी आपण सर्व कुटुंबाच्या वतीने पत्र लिहिलेत ते वाचून अतिशय आनंद झाला.

पण आपल्या मुलीचा विवाह झाला तेव्हा पत्र आपण का लिहिले नाही हे मला समजत नाही. कदाचित त्यावेळी मी जास्त आजारी असेन किंवा जगात नसेलही अशी आपणास शंका आली असावी असे माझ्या मनाला शंका चाटून गेली.

प्रा० वि० ह० कुळकर्णी यांच्या आठवणी हा ग्रंथ छापून झाला की मी तो विकत घेईन. मला शिवाजी विद्यापीठाने डी० लिट् १२-१२-८० रोजी दिल्यावर आमच्या घरासमोरील ग्रंथसंग्रहालयाने माझा सत्कार केला. त्याचे प्रा० कुळकर्णी हे अध्यक्ष होते. मी काही कारणांमुळे खाली उतरलो. चहा घेतला. तितक्यात ते तेथे आले व म्हणाले 'अहो कीर, तुमची पुस्तके पाहण्यास मी येत आहे येऊ का?' मी म्हटले, 'चला!' ते दोन मजले चढून वर आले व मला म्हणाले, 'तुमच्या सभोवती पुस्तकेच पुस्तके असतात असे मी वाचले होते म्हणून म्हटलं अेकदा पहावं तुमचे वाचनालय.' त्यांनी छताला लावलेली कपाटे पाहिली, खाटेखालच्या पाच ट्रंका पाहिल्या, कपाटे पाहिली, मी बाकावर बसतो ते कपाट, बाक ग्रंथांनी भरलेले पाहिले आणि प्रवेश दारावर लावलेल्या फळ्या पुस्तकांनी नि वह्यांनी भरलेल्या पाहिल्या तेव्हा ते आश्चर्य चकित होऊन गेले व मग म्हणाले, 'खरेच, तुम्ही पुस्तकात राहता!' त्यापूर्वी पाचसहा वर्षापूर्वी एक गोष्ट घडली होती. त्यांची खात्री होईना की माझी इंग्रजी चरित्रे संपतात ही. मी त्यांना म्हणालो, 'अहो दुसरी, तिसरी, चौथी आवृत्ती कशी निघेल.' तेव्हा ते गप्प बसले. हे घडले आम्ही 'रवींद्र' मध्ये गं० दे० खानोलकारांच्या व्याख्यानास जात होतो तेव्हा.

ते मोठे नाणावलेले प्राध्यापक होते. त्यांचे शिष्य अनेक होते. ते त्यांना मानीत असत.

आता आम्ही सुखरूप आहोत. या वयात दुखणी यायचीच. त्याला तयार असले पाहिजे. मला डोळे मिळाले हे माझे म्हातारपणातले सुख. नाहींतर जगून उपयोग नव्हता. कदाचित आत्महत्या हाच एक उपयोगी ठरला असता. पण तशी वेळ माझ्यावर आली नाही. सौ सुधाबाअी आता बरी आहे. आपली आठवण होते. पुण्याचे कार्यक्रम नाकारतो, कारण मला तो त्रास झेपणार नाही.

आपली आम्ही वाट पाहात आहो. अवश्य यावे. जेवावयास यावे. श्री किशोर पंतांना सुद्धा आणावे. मुलीचा विवाह कोणाशी झाला? ती सुखात असेल आम्ही आशा करतो.

आपण उभयतांनी यावे अशी नम्र विनंती आहे.

आपला नम्र,

धनंजय कीर



**DR. DHANANJAY KEER** (D. Litt)

Tel.: 451472

77, Bhageshwar Bhuvan,
Lieut. Dilip Gupte Road,
Mahim, BOMBAY-400 016

Date १६-७-८३

प्रिय सौ. आशा धारप यांसी —

मी आपल्या आमंत्रणाप्रमाणे प्रा. वि. ह. कुलकर्णी यांच्यावरील पुस्तकाच्या प्रकाशन समारंभाला उपस्थित राहिलो होतो. नंतर गांवी गेलो रत्नागिरीस. मध्यंतरी कृपया आपण पुस्तक पाठविलेत. ते मला जूनमध्ये येथे आल्यावर मिळाले.

ग्रंथ चांगला आहे. लेखन बरेच दिवस वाचावयाचे राहिले. आता वाचले. ग्रंथ परिपूर्णच असून त्याचे संपादन चांगले झाले आहे. प्रा. कुलकर्णींचे स्नेही श्री ग. दु. खानोलकर यांची आठवण त्यांत नाही हे पाहून मला वाईट वाटले. श्री खानोलकर हे त्यांच्याकडे उतरले असता त्यांच्या भेटीसाठी ते (कुलकर्णी) तीन दिवस दररोज येत असत. त्यांचा इतिहास मोठा उद्बोधक आहे.

आपण आता ग्रंथलेखन सुरू केले आहे. त्याला खंड पडू नये हीच सदिच्छा.

मुलांना आशीर्वाद. मी मधूनमधून व सौ. सुधा आजारी असतो. पण आता या वयात असून चालेल ते दिवस आपले.

आपण सर्व मंडळी खुशाल आहात असे मानतो.

आपले प्रास्ताविक भाषण चांगले झाले. अभिनंदन!

कळावे.

लोभ आहे,
आपला नम्र,
धनंजय कीर

धनंजय कीर ह्यांचे पत्र क्र० ०२

DHANANJAY KEER (D.Lit)
Tel. : 451472

77, Bhageshwar Bhuvan,
Liuet. Dilip Gupte Road,
Mahim, BOMBAY - 400016
Date १६-७-८३

प्रिय सौ० आशा धारप यांसी —

मी आपल्या आमंत्रणाप्रमाणे प्रा० वि० ह० कुळकर्णी यांच्यावरील पुस्तकाच्या प्रकाशन समारंभाला उपस्थित राहिलो होतो. नंतर गांवी गेलो रत्नागिरीस. मध्यंतरी कृपया आपण पुस्तक पाठविलेत. ते मला जूनमध्ये येथे आल्यावर मिळाले.

ग्रंथ चांगला आहे. लेख बरेच दिवस वाचावयाचे राहिले. आता वाचले. ग्रंथ पहिलाच असून त्याचे संपादन चांगले झाले आहे. प्रा० कुळकर्ण्यांचे स्नेही श्री० गं० दे० खानोलकर यांची आठवण त्यांत नाही हे पाहून मला वाईट वाटले. श्री० माडखोलकर हे त्यांच्याकडे उतरले असता त्यांच्या भेटीसाठी ते (कुलकर्णी) तीन दिवस दररोज येत असत. त्याचा इतिहास मोठा उद्बोधक आहे.

आपण आता ग्रंथ लेखन सुरू केले आहे. त्याला खंड पडू नये हीच सदिच्छा.

मुलांना आशीर्वाद. मी मधूनमधून व सौ सुधा आजारी असते. पण आता या वयात जपून जातील ते दिवस आपले.

आपण सर्व मंडळी खुशाल आहात असे मानतो.

आपले प्रास्ताविक भाषण चांगले झाले. अभिनंदन !

कळावे.

मी आहे,
आपला नम्र,
धनंजय कीर

# प्रभाकर पाध्ये


३ कमलबाग
गोखले रोड
पुणे ४११०१६
२८।११।१९८०

प्रिय श्रीमती सौ. आशा किशोर
धारप यांस —
सप्रेम नमस्कार
आपले पत्र.
विठ्ठलरावांनी मला मराठीत लिहायला शिकवले
तेव्हा त्यांच्याबद्दल अवश्य लिहीन.
मात्र वेळेचे बंधन सक्त नसावे. आ०
प्रभाकर पाध्ये

प्रभाकर पाध्ये ह्यांचे पत्र क्र० ०१

३ कमलबाग

गोखले रोड

पुणे ४११०१६

२८|११|१९८०

प्रिय श्रीमती सौ० आशा किशोर

धारप यांस —

सप्रेम नमस्कार

आपले पत्र.

विठ्ठलरावांनी मला मराठीत लिहायला शिकवले तेव्हा त्यांच्याबद्दल अवश्य लिहीन. मात्र वेळेचे बंधन सक्त नसावे.

आ०

प्रभाकर पाध्ये



३ कमळबाग
गोखले रोड
पुणे ४११०१६
५।६।१९८३

स.न.वि.

विठ्ठलरावांवरच्या पुस्तकाची प्रत मिळाली. आभारी आहे.

पुस्तक चांगले काढले आहे.

अद्याप पूर्ण वाचून झाले नाही. पण वि.हं.च्या व्यक्तित्वाचे चांगले दर्शन होते.

आपला, प्रभाकर पाध्ये

प्रभाकर पाध्ये ह्यांचे पत्र क्र० ०२

३ कमल बाग
गोखले रोड
पुणे ४११०१६
५|६|१९८३

स० न० वि०

विठ्ठलरावांवरच्या पुस्तकाची प्रत मिळाली. आभारी आहे.

पुस्तक चांगले काढले आहे.

अद्याप पूर्ण वाचून झाले नाही. पण वि० हं० च्या व्यक्तित्वाचे चांगले दर्शन होते.

आपला,
प्रभाकर पाध्ये

# चारुशीला गुप्ते



फोन–८१२२८६

डॉ. सौ. चारुशीला गुप्ते
एम. ए., पीएच्. डी.

५८ ए, वाळकेश्वर रोड, मुंबई ४०० ००६.

दिनांक २६।७।८१

प्रिय सौ. आशा धारप
स्नेहपूर्वक नमस्कार

आपले पत्र मिळाले. मी प्रा. कुळकर्णी यांच्या संबंधीच्या आठवणी ४/५ दिवसांत पाठवून देते. विलंब झाल्याबद्दल क्षमस्व! परंतु मी अनेक कामांत गुंतल्यामुळे वेळ मिळाला नाही. मी दि. ४, ५, ६ ऑगस्ट रोजी पुण्यात आहे. [illegible] नंतर आठवणी नक्की देणार आहे.

आपली
चा. गुप्ते

चारुशीला गुप्ते ह्यांचे पत्र

फोन — ८१२२८६

**डॉ० सौ० चारुशीला गुप्ते**

एम० ए०, पीएच्० डी०

---

५८ ए, वाळकेश्वर रोड, मुंबई ४०० ००६

२६।७।८१

प्रिय सौ० आशा धारप

स्नेहपूर्वक नमस्कार

आपले पत्र मिळाले. मी प्रा० कुळकर्णी यांच्या संबंधीच्या आठवणी ४/५ दिवसांत पाठवून देते. विलंब लागल्या बद्दल क्षमस्व! परंतु मी अनेक कामांत गुंतल्यामुळें वेळ मिळाला नाही. मी दि० ४, ५, ६ ऑगस्ट रोजी पुण्यातच आहे. शक्य झाल्यास भेटेन. आठवणी नक्की देणार आहे.

आ०<br>सौ० गुप्ते

# सुमती देवस्थळे



५-११-८०

सौ. आशा धारप यांना सप्रेम नमस्कार, वि. वि.

आपले पत्र मिळाले. धन्यवाद.

प्रा. वि. ह. कुळकर्णींच्या बद्दल आपल्या मनात जी आदर-
-भावना आहेत, तीच माझ्याही मनात आहे. मी आपणास
आठवणी लिहून पाठवीन. प्रथम त्या प्रा. वि. ह. कुळकर्णी.
कडे धाडते — मग ते आपणाकडे धाडतील.

दिवाळीनिमित्त आपल्या कुटुंबियास शुभेच्छा

आ. सुमती देवस्थळे

सुमती देवस्थळे ह्यांचे पत्र

५-११-८०

सौ० आशा धारप यांना सप्रेम नमस्कार, वि० वि०

आपले पत्र मिळाले. धन्यवाद.

प्रा० वि० ह० कुळकर्णींच्या बद्दल आपल्या मनात जी आदरभावना आहेत, तीच माझ्याही मनात आहे. मी आपणास आठवणी लिहून पाठवीन. प्रथम त्या प्रा० वि० ह० कुलकर्णींकडे धाडते — मग ते आपणाकडे धाडतील.

दिवाळीनिमित्त आपल्या कुटुंबियास शुभेच्छा.

आ० सुमती देवस्थळे

# पां० वा० गाडगीळ



२२ वसंत, कार्टर रोड, खार (दांडा)
मुंबई ५२ दि. २१-४-८१

सौ. आशाताई धारप यांस न. वि.

आपले १७-४-८१ चे पत्र पोचले. प्रा. वि. ह. कुलकर्णी यांना मी चाळीस वर्षांहून अधिक काळ ओळखतो व पश्चिम दादर भागात एकमेकापासून थोड्याच अंतरावर दीर्घकाळ आम्ही राहिलो, तरी संस्मरणीय आठवणी लिहाव्या इतका दाट परिचय कुलकर्णी यांचे शी माझा आलेला नाही. मी त्यांचा केळकरांवरील निबंध, अच्युतराव चरित्र व रॉ-चरित्र एवढेच त्यांचे वाङ्मय वाचले आहे. म्हणून कुलकर्णी यांचे विषयी मी आठवणी लिहू शकणार नाही.

शिवाय कुलकर्णी यांच्या संबंधाने निवळ आठवणीवजा पुस्तक त्यांच्या मित्रांनी व शिष्यांनी काढणे योग्य नाही. ते इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून श्रेष्ठ दर्जाचे होते व शेक्सपीयर मोठ्या विद्वत्तेने शिकवीत. त्यांच्या या गुणावर त्यांच्या हुशार विद्यार्थ्यांनी निबंध लिहून पुस्तक काढले



२

तर कुलकर्णी यांचा खरा गौरव होईल.

आठवणी-वाङ्मय कृत्रिम ठरते. लेखकांच्या आठवणींनी लेखकांचे सत्य-स्वरूप झाकले आहे.

सौभाग्यवतीची प्रकृती बरी आहे. आम्ही सर्व खुशाल आहो. किशोर भाऊंना नमस्कार

आपला
पां. वा. गाडगीळ

पां० वा० गाडगीळ ह्यांचे पत्र क्र० ०१

२२, वसंत, कार्टर रोड, खार (दांडा)

मुंबई ५२ दि० २१-४-१९८१

सौ० आशाताई धारप यांस न० वि०

आपले १७-४-८१ चे पत्र पोचले. प्रा० वि० ह० कुलकर्णी यांना मी चाळीस वर्षांहून अधिक काळ ओळखतो व पश्चिम दादर भागात एकमेकापासून थोड्याच अंतरावर दीर्घकाळ आम्ही राहिलो, तरी संस्मरणीय आठवणी लिहाव्या इतका दाट परिचय कुलकर्णी यांचेशी माझा झालेला नाही. मी त्यांचा केळकरांवरील निबंध, अच्युतराव चरित्र व शॉ-चरित्र एवढेच त्याचे वाङ्मय वाचले आहे. म्हणून कुलकर्णी यांचे विषयी मी आठवणी लिहू शकणार नाही.

शिवाय कुलकर्णी यांच्या संबंधाने निवळ आठवणीवजा पुस्तक त्यांच्या मित्रांनी व शिष्यांनी काढणे योग्य नाही. ते इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून श्रेष्ठ दर्जाचे होते व शेक्सपीयर मोठ्या विद्वत्तेने शिकवीत. त्यांच्या या गुणांवर त्यांच्या हुशार विद्यार्थ्यांनी निबंध लिहून पुस्तक काढले तर कुलकर्णी यांचा खरा गौरव होईल.

आठवणी-वाङ्मय कृत्रिम ठरते. टिळकांच्या आठवणींनी टिळकांचे सत्य-स्वरूप झाकले आहे.

सौभाग्यवतीची प्रकृती बरी आहे. आम्ही सर्व खुशाल आहो. किशोरभाऊंना नमस्कार.

आपला

पां० वा० गाडगीळ.


२२, वसंत, कार्टर रोड, खार (दांडा)
मुंबई ५२ दि. १६-५-५२

सौ. आशाताई यांना नमस्कार.
मी दहा दिवस नागपूरला गेलो होतो.
आपले ५ तारखेचे पत्र, परवा परत
आल्यावर मिळाले. समारंभ फारच
चांगला झाला. पुस्तकही पोचले.
लेखकांची निवड फारयोग्य आहे.
अशा सर्व कामात खटाटोप
फार असतो. गुरुभक्तीने प्रेरित होऊन आपण
हे सर्व काम यथासांग पार पाडले या-
बद्दल आपणांस धन्यवाद. सौभाग्य-
वतीची प्रकृती बरी आहे. आपल्या
घरच्या सर्व मंडळींस नमस्कार. आपला
पां. वा. गाडगीळ

पां० वा० गाडगीळ ह्यांचे पत्र क्र० ०२

२२, वसंत, कार्टर रोड, खार (दांडा)
मुंबई ५२ दि० १६-५-५२[१]

सौ० आशाताई यांना नमस्कार.

मी दहा दिवस नागपूरला गेलो होतो. आपले ५ तारखेचे पत्र, परवा परत आल्यावर, मिळाले. समारंभ फारच चांगला झाला. पुस्तकही पोचले. लेखकांची निवड फार योग्य आहे. अशा सर्व कामात खटाटोप फार असतो. गुरुभक्तीने प्रेरित होऊन आपण हे सर्व काम यथासांग पार पाडले याबद्दल आपणांस धन्यवाद. सौभाग्यवतीची प्रकृती बरी आहे. आपल्या घरच्या सर्व मंडळीस नमस्कार.

आपला
पां० वा० गाडगीळ

[१] ८३ हवे. चुकीने ५२ असे झाले असावे.

# गं० दे० खानोलकर


शिवनेरी;
४१ शिवाजी पार्क
मुंबई २८

अनेक नमस्कार वि० वि०

आपलें दि० २६.१०.८० चें पत्र मिळालें.
आपल्या अपेक्षेप्रमाणें मला आपल्या ग्रंथासाठीं लिहिण्यास सवड होण्यासारखी नाही.
दिलगीर आहें.
क० ही विनंती

आ०
गं० दे० खानोलकर

गं० दे० खानोलकर ह्यांचे पत्र

शिवनेरी;

४१, शिवाजी पार्क

मुंबई २८

अनेक नमस्कार वि० वि०

आपलें दि० २६.१०.१९८० चें पत्र मिळालें.

आपल्या अपेक्षेप्रमाणें मला आपल्या ग्रंथासाठीं लिहिण्यास सवड होण्यासारखी नाही.

दिलगीर आहें.

क० ही विनंती

आ०

गं० दे० खानोलकर

# व० दि० कुळकर्णी



ॐ

पार्ले, मुंबई-५७.
२०.११.१९८०

श्री. आनंद साधले
यांना
स० नमस्कार, वि. वि.

आपले दि. २१/१०/८० चे पत्र मिळाले. मी १२/१०/८० पासून आजारी आहे. Slipped-disc ने आजारी असल्याने बेड-रेस्ट घेत आहे. आता वेदना कमी आहेत, पण स्वस्थपणे बरे होण्यास अजून एक महिना तरी लागेल. मी सध्या रजेवर आहे.

[illegible] विश्रांतीने [illegible] वाचन [illegible] होते. बसायला मनाई असल्याने लेखन करणे. कोणी सांगून लिहून घ्यावे लागते. हे पत्र मी पडूनच लिहीत आहे.

आपण प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्याविषयी लेखासंबंधी लिहिले. अवश्य देईन. अतिशय आनंदाने. फार चांगले काम आपण त्यांच्या विद्यार्थ्यांनी हाती घेतले आहे. प्रा. वि. ह. च्या अमृतमहोत्सवप्रसंगी मी जे बोललो तेच लेखरूपाने देईन. आताच प्रा. वि. ह. ना मी पत्र पाठविले आहे.

गेल्या दोन-अडीच महिन्यात मी मुंबईस आलो नाही. आणि आणखी दोन महिने मला येणे शक्य होणार नाही. प्रवास करण्यास डॉक्टरांनी मना केले आहे. ते योग्यच आहे. सवडीने मुंबईस येईन तेव्हा आपणास कळवीन.

आता श्री. धारप यांची प्रकृती पूर्णपणे सुधारली असेल. त्यांना माझा स० नमस्कार सांगावे. चिरंजीवांना स. आशीर्वाद. कळावे आपला

व. दि. कुळकर्णी

व० दि० कुळकर्णी ह्यांचे पत्र

पारले, मुंबई - ५७.

२०.११.१९८०

ॐ

सौ० आशा धारप

यांना

स० नमस्कार वि० वि०

आपले दि २१।१०।१९८० चे पत्र मिळाले. मी १२।१०।८० पासून घरीच आहे. slipped disc ने आजारी असल्याने बेड रेस्ट घेत आहे. आता वेदना कमी आहेत, पण खडखडीत बरे होण्यास अद्याप एक महिना तरी लागेल. मी सध्या रजेवरच आहे.

एका तऱ्हेने ही विश्रांतीच म्हणायची. वाचन मनसोक्त होते. बसायचे नसल्याने लेखन कमी. तोंडी सांगून लिहवून घ्यावे लागते. हे पत्र मी पडूनच लिहीत आहे.

आपण प्रा० वि० ह० कुळकर्णी यांच्यावरील लेखासंबंधी लिहिले. अवश्य देईन. अत्यंत आनंदाने. फार चांगले काम आपण त्यांच्या विद्यार्थ्यांनी हाती घेतले आहे. प्रा० वि० हं०च्या अमृतमहोत्सव प्रसंगी मी जे बोललो तेच लेखरूपाने देईन. आजच प्रा० वि० हं०ना मी पत्र पाठविले आहे.

गेल्या दोन-अडीच महिन्यात मी पुण्यास आलो नाही. आणि आणखी दोन महिने मला येणे शक्य होणार नाही. प्रवास करण्यास डॉक्टरांनी मना केले आहे. ते योग्यच आहे. सवडीने पुण्यास येईन तेव्हा आधी कळवीन.

आता श्री० धारप यांची प्रकृती पूर्णपणे सुधारली असेल. त्यांना माझा स० नमस्कार सांगणे. चिरंजीव मंडळींना स० आशीर्वाद. कळावे.

आपला

व० दि० कुळकर्णी

# मो॰ वि॰ महाशब्दे



Prof M. V. MAHASHABDE
Sanskrit Dictionary Dept.
Deccan College, PUNE - 6.
Tel. 27231

'Ashirvad'
136, Mohan Nagar,
Chinchwad, PUNE-411 019.
Tel. 83143

१४-९-८२

सौ. आशा धारप यांस –

सोबत प्रा. वि. ह. कुळकर्णींकडून संस्कृतमधून चार ओळी पाठविल्या आहेत. योग्य वाटल्यास अन्वयार्थ छापावा. कार्यबाहुल्यामुळे थोडा उशीर झाला याबद्दल दिलगीर आहे.

छापण्यास असल्यास प्रूफ नीट तपासले जाईल, चुका होणार नाहीत याची काळजी घ्यावी – संस्कृत असल्यामुळे ही सूचना. प्रूफ माझेकडे पाठविले तरी मी तपासून देईन – श्री. धारप यांना सप्रेम नमस्कार

मो. वि. महाशब्दे

मो॰ वि॰ महाशब्दे ह्यांचे पत्र

Prof M. V. MAHASHABDE
Sanskrit Dictionary Dept.
Deccan College, PUNE-6
Tel. 27231

'Ashirvad'
136, Mohan Nagar,
Chinchwad, PUNE-411 019
Tel. 83143
१४-९-८२

सौ॰ आशा धारप यांस —

सोबत प्रा॰ वि॰ ह॰ कुलकर्णींबद्दल संस्कृतमधून चार ओळी पाठविल्या आहेत. योग्य वाटल्यास अन्तर्भाव करावा. कार्यबाहुल्यामुळे थोडा उशीर झाला याबद्दल दिलगीर आहे.

छापणार असल्यास प्रूफ नीट तपासले जाईल, चुका राहणार नाहीत याची काळजी घ्यावी — संस्कृत असल्यामुळे ही सूचना. प्रूफ माझेकडे पाठविले तरी मी तपासून देईन — श्री॰ धारप यांस सप्रेम नमस्कार

मो॰ वि॰ महाशब्दे

# अरविंद ताटके



८.१०.१९८० श्री 'मंधार' रामदास को० हा० सो०
घंटाळी, ठाणे, ४००६०२

सौ० आशाबाई यांस, सप्रेम न० वि० वि०

आपले दि० २ डिसेंबरचे पत्र मिळाले.

माझे ज्येष्ठ मित्र प्रा० वि० ह० कुलकर्णी यांच्याविषयी आपण आठवणी जमविल्या आहात. ही अगदी स्तुत्य अशीच गोष्ट आहे. त्यांच्याशी माझा परिचय कै० ग० त्र्यं० माडखोलकरांमुळे झाला अन् त्या परिचयाचं रूपांतर स्नेहात झालं. तो स्नेह गेली १५ वर्षं टिकून आहे. त्यांच्या आठवणी सांगण्यापेक्षा त्यांच्यासंबंधी एखादा लेख मी आपल्याला पाठवू शकेन. कसं करू ते कळवावे.

वि० ह० च्या पंचाहत्तरीच्या वेळी बरेच चांगले लेख प्रसिद्ध झालेले आहेत. ते जमविलेत का? आनंद साधल्यांनी लिहिलेला लेख सुरेख आहे. माझ्या संग्रही काही लेख सापडतील.

आठवणी आपण पुस्तकरूपानं प्रकाशित करणार काय? तसं केलंत तर त्यात वि० ह० चे संपूर्ण चरित्र (Life sketch) देण्यास विसरू नये. त्यांचा जीवनपट तयार करावा.

बरेच दिवसात मी वि० ह० ना भेटलेलो नाही. पण लेखासाठी सवडीनं भेटीन. अलीकडेच त्यांची कोल्हटकर-गडकरी यांची चरित्रं प्रसिद्ध झाली. आता माडखोलकरांचं विस्तृत चरित्र त्यांच्याहातून व्हावं अशी माझी अपेक्षा आहे.

आपले काय काय लेखन प्रकाशित झालंय? मुंबईस आलात की ठाण्याला आमच्याकडे या. आ० स्नेहांकित

आपल्या यजमानांना स.न.

कळावे

अरविंद ताटके

अरविंद ताटके ह्यांचे पत्र क्र० ०१

१४।२।८४ श्री 'मंदार' रामदास को० हा० सो०
घंटाळी, ठाणे, ४०० ६०२

सौ० आशाबाई यांस, सप्रेम न० वि० वि०

आपलं दि० २ डिसेबरचं पत्र मिळालं.

माझे ज्येष्ठ मित्र प्रा० वि० ह० कुळकर्णी यांच्याविषयी आपण आठवणी जमवित आहात ही अगदी स्तुत्य अशीच गोष्ट आहे. त्यांच्याशी माझा परिचय कै० ग० त्र्यं० माडखोलकरांमुळं झाला अन् त्या परिचयाचं रूपान्तर स्नेहात झालं. तो स्नेह गेली १५ वर्षं टिकून आहे. त्यांच्या आठवणी सांगण्यापेक्षा त्यांच्यासंबंधी एखादा लेख मी आपल्याला पाठवू शकेन. कसं करू ते कळवावे.

वि० हं च्या पंचाहत्तरीच्या वेळी बरेच चांगले लेख प्रसिद्ध झालेले आहेत. ते जमविलेत का? आनंद साधल्यांनी लिहिलेला लेख सुरेख आहे. माझ्या संग्रही काही लेख सापडतील.

आठवणी आपण पुस्तकरूपानं प्रकाशित करणार काय? तसं केलंत तर त्यांत वि० हं चं संपूर्ण चरित्र (life sketch) देण्यास विसरू नये. त्यांचा जीवनपट तयार करावा.

बरेच दिवसात मी वि० हं० ना भेटलेलो नाही. पण लेखासाठी सवडीनं भेटीन. अलीकडंच त्यांची कोल्हटकर-बर्नाड शाँची चरित्र प्रसिद्ध झाली. आता माडखोलकरांचं विस्तृत चरित्र त्यांच्या हातून पुरं व्हावं अशी माझी अपेक्षा आहे.

आपलं काय काय लेखन प्रकाशित झालंय? मुंबईस आलात की ठाण्याला आमच्याकडे या.

आपल्या यजमानांना स० न०

कळावे

आ० स्नेहांकित

अरविंद ताटके



१४/२/८४ श्री 'मंदार' रामदास को० हा० सो०
पंचवटी, पुणे ४००८०२

ता. क. तुम्ही मला ८० च्या वाढदिवशी आठवणींतें जे पत्र पाठविलेंत व आता पुस्तकही पाठविलेंत त्यावरून चांगुलपणा तुमच्यात ओतप्रोत भरलेला असावा असं मला खात्री वाटते. म्हणूनच सावकाश पत्र पाठवावे. अरविंद

चि० सौ० आशाताई यांस अने० आशी० वि० वि०

आज तुम्ही पाठविलेलं वा०स्व० वि०ह० कुलकर्णींच्या आठवणींचं पुस्तक मिळालं. एवढं महाग पुस्तक तुम्ही मला भेट म्हणून पाठविलंत त्याबद्दल तुमच्या औदार्याचे आभार मानतो - कृतज्ञता व्यक्त करतो. माझी काही पुस्तकं तुम्हास देईन.

पुस्तकातल्या काही आठवणी वाचूनही झाल्या. वि०हंच्या कन्येनं - इरावती कुलकर्णी ह्यांनी लिहिलेल्या आठवणींनं माझे डोळे पाणावले. माझी वि०हं०शी ओळख जवळ जवळ २० वर्षं होती. पण त्यांच्यावर लिहायचं राहून गेलं त्याबद्दल कृपया तुम्ही मला क्षमा करायला हवी. माझी नोकरी कारखान्याची होती. स्वभाव आळशी, सुस्त, गाफिल व एकंदर स्वास्थ्यप्रिय! त्यामुळं वेळेवर कुठल्याच गोष्टी माझ्या हातनं पार पडत नाहीत.

माझ्या माडखोलकरांवरील छोट्या पुस्तकाला वि०हंचीच प्रस्तावना आहे. तुम्ही ते पुस्तक पाहिलेत काय? पहा. नसेल तर प्रत्यक्ष भेटीत तुम्हाला देईन. तुम्ही मुंबईला याल तेव्हा ठाण्याला माझ्याकडे अवश्य या अगर माझ्याकडेच मुक्काम या म्हणजे पुष्कळ बोलता येईल. तुम्हाला पुढं काही लेखन करायचं असलं वर माझी मदत तुम्हाला अवश्य होईल.

पहिलाच प्रयत्न या दृष्टीनं तुम्ही पुस्तकाचं संपादन चांगलं केलंय. आठवणी-गोळा करत गौरवग्रंथ-स्मृतिग्रंथ काढणं ही सोपी गोष्ट नाही. तुम्ही ही कठीण गोष्ट करून



गुरुदक्षिणा उत्तम प्रकारे फेडलीत त्याबद्दल तुम्हाला मनःपूर्वक धन्यवाद देतो अन् यापुढेही तुमच्या हातनं ग्रंथसेवेची निर्मिती होवो असा वडिलकीच्या नात्यानं तुम्हाला आशीर्वाद देतो.

वि०हंचं माडखोलकर चरित्र पुण्याचं व्हीनस प्रकाशन प्रकाशित करणार होते. ते प्रकाशित झालं काय?

तुमचं नवीन लेखन काय चाललंय? तुम्हाला चरित्र लेखन करण्याची आवड आहे काय? असेल म्हणून लेखिका बनायचं तर जरूर बना. तुम्हाला वेगळी प्रतिमा (Image) लाभेल. पण पैसा कीर्ती मिळेल या भानगडीत पडू नका. अजूनतरी लेखक-लेखिका या आपल्याकडे उपेक्षेच्याच वस्तू आहेत. चित्रपट वाङ्मय काढणारे प्रकाशक कोण? आता मी निवृत्त असल्यानं वेळ मजेत जातो. वाचन करतो. लेखनाच्या भानगडीत अजून उतरलो नाही. साठाव्या वाढदिवशी एक कवितासंग्रह प्रकाशित झाला. सावकाश पत्र सवडीने लिहावे. पुण्यास येईन तेव्हा भेटेन. यजमानांना स०न०.

आपला स्नेहांकित
अरविंद ताटके

अरविंद ताटके ह्यांचे पत्र क्र० ०२

१४।२।८४ श्री 'मंदार' रामदास को० हा० सो०
घंटाळी, ठाणे, ४०० ६०२

ता० क० : तुम्ही मला ६० व्या वाढदिवशी आठवणीनं जे पत्र पाठविलंत व आता पुस्तकही पाठविलंत त्यावरून चांगुलपणा तुमच्यात शिगोशिग भरलेला असावा अशी मला खात्री वाटते. म्हणूनच सविस्तर पत्र पाठवावे

अरविंद

चि० सौ० आशाताई यांस अने० आशी० वि० वि०

आज तुम्ही पाठविलेलं ती० स्व० वि० ह० कुळकर्णींच्या आठवणींचं पुस्तक मिळालं. एवढं महाग पुस्तक तुम्ही मला भेट म्हणून पाठविलंत त्याबद्दल तुमच्या औदार्याचे आभार मानतो — कृतज्ञता व्यक्त करतो. माझी काही पुस्तकं तुम्हास देईन.

पुस्तकातल्या काही आठवणी वाचूनही झाल्या. वि० हं च्या कन्येनं — इरावती कुळकर्णी ह्यांनी लिहिलेल्या आठवणीनं माझे डोळे पाणावले. माझी वि० हं० शी ओळख जवळ जवळ २० वर्षं होती. पण त्यांच्यावर लिहायचं राहून गेलं त्याबद्दल कृपया तुम्ही मला क्षमा करायला हवी. माझी नोकरी कारखान्याची होती. स्वभाव आळशी, सूस्त, गप्पिष्ट व एकंदर स्वास्थ्यप्रिय ! त्यामुळं वेळेवर कुठल्याच गोष्टी माझ्या हातनं पार पडत नाहीत.

माझ्या माडखोलकरांवरील छोट्या पुस्तकाला वि० हं चीच प्रस्तावना आहे. तुम्ही ते पुस्तक पाहिलंत काय? पहा. एरवी प्रत्यक्ष भेटीत तुम्हाला देईन. तुम्ही मुंबईला याल तेव्हा ठाण्याला माझ्याकडं अवश्य या अगर माझ्याकडंच मुद्दाम या म्हणजे पुष्कळ बोलता येईल. तुम्हाला पुढं काही लेखन करायचं असलं तर माझी मदत तुम्हाला अवश्य होईल.

पहिलाच प्रयत्न या दृष्टीनं तुम्ही पुस्तकाचं संपादन चांगलं केलंय. आठवणी गोळा करून गौरवग्रंथ-स्मृतिग्रंथ काढणं ही सोपी गोष्ट नाही. तुम्ही ही कठीण गोष्ट करून गुरुऋण उत्तमप्रकारं फेडलंत त्याबद्दल तुम्हाला मनःपूर्वक धन्यवाद देतो अन् यापुढंही तुमच्या हातनं ग्रंथसंपत्ती निर्माण होवो असा वडिलकीच्या नात्यानं तुम्हाला आशीर्वाद देतो.

वि० हं चं माडखोलकर चरित्र पुण्याचं व्हीनस प्रकाशन प्रकाशित करणार होतं. ते प्रकाशित झालं काय?

तुमचं नवीन लेखन काय चाललंय? तुम्हाला चरित्र लेखन करण्याची आवड आहे काय? व्रत म्हणून लेखिका बनायचं तर जरूर बना. तुम्हाला वेगळी प्रतिमा (Image) लाभेल. पण पैसा-कीर्ती मिळेल या भावनेनं त्यात पडू नका. अजून तरी लेखक-लेखिका या आपल्याकडं उपेक्षेच्याच वस्तू आहेत. चित्रपट वार्षिक काढणारे धारप कोण? आता मी निवृत्त असल्यानं वेळ मजेत जातो. वाचन करतो. लेखनाचा मांड अजून उभारला नाही. साठाव्या वाढदिवशी एक कांदबरी प्रकाशित झाली. सविस्तर पत्र सवडीनं लिहावे. पुण्यास येईन तेव्हा भेटेन. यजमानांना स० न०

आपला स्नेहांकित
अरविंद ताटके

# बाळ कुडतरकर



BAL KUDTARKAR B.A
Lakshmi Narayan Niwas,
25th Road, T. P. S III,
Bandra, Bombay-400 050.
Tel: 535858

दि. २०.१२.८०.

सौ० आशा किशोर ईशरप यांस,

स.न.वि.वि.

वास्तविक पत्रोत्तराला फारच उशीर झाला आहे. पण नाईलाज. आकाशवाणीवर असताना थोडीतरी उसंत मिळायची परंतु आतां अनेक सांस्कृतिक आणि व्यावसायिक व्यवधानांत गुंतल्यामुळें पंचाईत होते.

मा. विठ्ठलरावांची आदरयुक्त जिव्हाळ्याचे संबंध अनेक वर्षांचे आहेत. त्यासंबंधींच्या आठवणी लिहायला हव्यात हे निश्चित परंतु त्या कधी पर्यंत हव्यात?

प्रा० ईशरप आणि सौ० सुहास यांचेही स्नेहसंबंध फार काळापासूनचे आहेत. आपल्या पत्रामुळें जुन्या आठवणी पुन्हां एकदां उजळल्या आहेत.

पत्रोत्तरास उशीर झाल्याबद्दल दिलगीर आहे कळावे.

आ.

बाळ कुडतरकर

बाळ कुडतरकर ह्यांचे पत्र

BAL KUDTARKAR B. A.
Lakshmi Narayan Niwas,
25th Road T.P.S III,
Bandra, Bombay- 400050

दि० २०.१२.८०

Tel 535858

सौ० आशा किशोर धारप यांस,

स० न० वि० वि०

वास्तविक पत्रोत्तराला फारच उशीर झाला आहे. पण नाईलाज. आकाशवाणीवर असताना थोडीतरी उसंत मिळायची परंतु आतां अनेक सांस्कृतिक आणि व्यावसायिक व्यवधानांत गुंतल्यामुळें पंचाईत होते.

मा० विठ्ठलरावांचे आदरयुक्त जिव्हाळ्याचे संबंध अनेक वर्षांचे आहेत. त्यासंबंधीच्या आठवणी लिहायला हव्यात हे निश्चित. परंतु त्या कधीपर्यंत हव्यात?

प्रा० धारप आणि सौ० सुहास यांचेही स्नेहसंबंध फार काळापासूनचे आहेत. आपल्या पत्रामुळें जुन्या आठवणी पुन्हां एकदा उजळल्या असो.

पत्रोत्तरास उशीर झाल्याबद्दल दिलगीर आहे कळावे

आ०

बाळ कुडतरकर

# व० गो० नातू


दूरध्वनी
६२६०२६

श्री प. ३१ शुभदा सोसायटी,
सहकार मार्ग,
विलेपार्ले - ४०००५७
१८-४-१९८३

स. न. वि. वि.

आपण आयोजित केलेला काल(१८-४) कार्यक्रम फारच चांगला झाला. दु. ४-२५ ला सुरू झालेला कार्यक्रम सर्व ६-२० ला संपला पण कंटाळवाणा झाला नाही.

आपले प्रास्ताविक फारच चांगले झाले. पैलदार पण आटोपशीर. आपले प्रसन्न व्यक्तित्व, मृदु सफाईदार [illegible] मोकळी [illegible] आपला [illegible] [illegible] आवाज ह्यांनी वातावरण भारून टाकले. सर्वच वक्ते चांगले बोलले. विषय एक पण विविधता भरपूर. सौ. इरावती भावविवश न होता बोलली हे कौतुकास्पद. सौ. इरावतींच्या घरी मी उद्या जाणार आहे.

विठ्ठलरावांच्या निधनानंतर फारच तुरळक लेख प्रसिद्ध झाले. साहित्य संघाशी त्यांचा निकट जवळचा संबंध पण त्यांनाही शोकसभा घ्यावीशी वाटली नाही. आपल्या पुस्तकाची प्रगती

व० गो० नातू ह्यांचे पत्र क्र० १.१



किती काळी ह्याची कल्पना नव्हती.
साहित्यिक मंडळींनी विदूषकांची
इतकी उपेक्षा का करावी कळत नव्हते.
त्यांचे शिक्षण परदेशात झाले म्हणून
तर ही उपेक्षा झाली नाही ना
असे अनेक विचार मनात येत.
काळाच्या ओघामुळे आणि आपल्या
पुस्तकांमुळे ह्या शंका खोट्या ठरल्या.
आपल्या पुस्तकात महाराष्ट्राच्या
सामान्य माणसापासून तो डॉक्टर पाध्ये
माधव मनोहर ह्यां सारख्या मातब्बरांपर्यंत
सर्वांनी आवडून लिहिले आहे.
पुस्तकाची अत घाईघाईत
चालली — लेखकांना पुस्तक पोस्टाने
घेईल असे प्रकाशकांनी सांगीतले.
कागद छपाई मुखपृष्ठ उत्तम आहे पण
छपाईतल्या चुका टाळता आल्या
असत्या तर बरे झाले असते.
आपण लिहिलेले हे काम
पुरे केलेत आणि काळाच्या
रंगभूमीचा अपूर्व योग जुळवून
आणलात ह्याबद्दल आपले अभिनंदन.
खरोखर काम रंगतदार की त्यांची
चव नाहीशी होते. बरं, आपले काम

व० गो० नातू ह्यांचे पत्र क्र० १.२



वारंवार दुसऱ्यांच्या सहकार्यावर
अवलंबून. ही सर्व परिस्थिति
नाउमेद करणारी. त्यातच विठ्ठलरावांचे
निधन. परवापर्यंतचा उत्साह मावळला
असता; पण आपण नेटाने काम
चांगल्या तऱ्हेने पुरे केलेत इतकेच
नव्हे तर पुस्तक प्रकाशनाच्या
निमित्ताने विठ्ठलरावांना श्रद्धांजली
वाहण्याची संधी त्यांना दिलीत.

आपले सुवाच्य अक्षरात व्यवस्थित
लिहिलेले पत्र वाचणं हा आमच्या घरी
सर्वांच्याच आनंदाचा विषय होता. केवळ
ओळख नसली तरी पत्रव्यवहाराने
नव्याने निर्माण झालेले ऋणानुबंध
टिकवले जावेत ही अपेक्षा आहे.

सर्वांस नमस्कार; लो. आ.

कळावे लोभ असावा

आपला,

व. गो. नातू

ता.क.: १३-च्या आठवणींना दिलेले
शीर्षक (All the humour standing on
the platform) आवडले. व. गो. नातू

व॰ गो॰ नातू ह्यांचे पत्र क्र॰ १.३

| दूरध्वनी | श्री | ३१, शुभदा सोसायटी, |
|---|---|---|
| ६२६०२६ | | सहकार मार्ग, |
| | | विलेपार्ले- ४०० ०५७ |
| | | १८-४-१९८३ |

स० न० वि० वि०

आपण आयोजीत केलेला कालचा (१७/४) कार्यक्रम फारच चांगला झाला. दु० ४.२५ ला सुरू झालेला कार्यक्रम सायं ६.२० ला संपला पण कंटाळवाणा झाला नाही.

आपलं प्रास्ताविक फारच चांगलं झालं. शैलीदार पण अकृत्रीम. आपलं प्रसन्न व्यक्तीत्व, मंद्र सप्तकातील माईकशी जुळणारा आपला सनईसारखा मंजूळ आवाज ह्यांनी वातावरण भारून टाकलं. सर्वच वक्ते चांगलं बोलले; विषय एक पण विविधता भरपूर. सौ० इरावती भावविवश न होता बोलली हे कौतुकास्पद. सौ० इरावतीच्या घरी मी उद्या जाणार आहे.

विठ्ठलरावांच्या निधनानंतर फारच तुरळक लेख प्रसिद्ध झाले. साहित्य संघाशी त्यांचा एवढा जवळचा संबंध पण त्यांनाही शोकसभा घ्यावीशी वाटलं नाही. आपल्या पुस्तकाची प्रगती किती झाली ह्याची कल्पना नव्हती. साहीत्यीक मंडळींनी विठ्ठलरावांची इतकी उपेक्षा का करावी कळत नव्हतं. त्यांचं निधन परदेशात झालं म्हणून तर ही उपेक्षा झाली नाही ना असे अनेक विचार मनात येत. कालच्या सभेमुळे आणि आपल्या पुस्तकांमुळे ह्या शंका खोट्या ठरल्या. आपल्या पुस्तकात माझ्यासारख्या सामान्य माणसापासून तो प्रभाकर पाध्ये, माधव मनोहर, ह्यांसारख्या मातबरांपर्यंत सर्वांनी आवर्जून लिहीलं आहे.

पुस्तकांची प्रत घाईघाईत चाळली — लेखकांना पुस्तक पोस्टाने येईल असं प्रकाशकांनी सांगीतले. कागद छपाई, मुखपृष्ठ उत्तम आहे पण छपाईतल्या चुका टाळता आल्या असत्या तर बरं झालं असतं.

आपण चिकाटीने हे काम पुरे केलेत आणि कालच्या समारंभाचा अपूर्व योग जुळवून आणलात ह्याबद्दल आपलं अभिनंदन. एखादं काम रेंगाळलं की त्यातली चव नाहीशी होते. बरं, आपलं काम बरंचसं दुसऱ्यांच्या सहकार्यावर अवलंबून. ही सर्व परिस्थिती नाऊमेद करणारी. त्यातच विठ्ठलरांवाचे निधन. एखाद्याचा उत्साह मावळला असता. पण आपण नेटाने काम चांगल्या तऱ्हेने पुरे केलेत एवेढच नव्हे तर पुस्तक प्रकाशनाच्या निमीत्ताने विठ्ठलरांवाना श्रद्धांजली वाहण्याची संधी चाहत्यांना दिलीत.

आपली सुवाच्य अक्षरात व्यवस्थीत लिहीलेली पत्रं वाचणं हा आमच्या घरी सर्वांचाच आनंदाचा विषय होता. भेटीगाठी शक्य नसल्या तरी पत्रव्यवहाराने नव्याने निर्माण झालेले ऋणानुबंध राखले जावेत ही अपेक्षा आहे.

थोरास नमस्कार; ल० आ०

कळावें. लोभ असावा

आपला,<br>
व० गो० नातू

ता० क० : माझ्या आठवणींना दिलेले शीर्षक (All the humour standing on the platform) आवडले.

व० गो० नातू

# वसंत देशमुख



VASANT G. DESHMUKH
Personal Executive to the Chairman,

MAKER & MAHER GROUP OF ENTERPRISES

वसंत देशमुख ह्यांचे पत्र

VASANT G. DESHMUKH
Personal Executive to the Chairman,

द्वारका सदन<br>
१६ (सी),<br>
शिवाजी पार्क<br>
मुंबई — ४०००२८<br>
१८:१२:८०

सौ० आशाताई धारप यांसी,

प्रा० वि० ह० कुलकर्णी आणि यांचेबाबत आपण जें पत्र मला २४/१० ला पाठविले होते ते कुठं तरी गहाळ झालं होतं. अवचित आता गवसलं. दिरंगाईबद्दल दिलगीर आहे.

प्रसिद्ध करण्यालायक आठवण आठवली तर लगेच पाठवीन[१] !

आ० स्ने०

वसंत देशमुख

---

[१] पाठवितो ?

# स्नेहप्रभा प्रधान



मुंबई २६
२६-४-८१

प्रिय आशा (धारप)

स.न. दोन्ही पत्रं मिळाली. प्रा. वि.ह. कुलकर्णी या संबंधी आठवणी लिहायला आपण सांगता आहात पण काय लिहावं हेच कळत नाही.

त्यांची आणि माझी भेट नेहमी एखाद्या व्याख्यानाच्या किंवा परिसंवादाच्या निमित्तानेच होत गेली. फार-फार वर्षांपूर्वी ते एकदा माझ्या घरी आले होते. 'पहिली मंगळागौर' यातील, नथ वगैरे घालून मी पूजेला बसलेली आहे, असं एक रंगीत मोठं चित्रं-फोटो-कोणत्यातरी मासिकात आलेला. ते माझ्यासाठी घेऊन आले होते. तो आजही माझ्या संग्रही आहे.

त्यांची आणि त्यांच्या सौ. पत्नींची माझ्याशी नेहमी स्नेहाची, जिव्हाळ्याची वागणुक होती.

त्यांच्या पत्नी गेल्यावर मला खूप दुःख झाले हे सांगणे नकोच.

वडील माणसांबद्दल वाटणारा आदर त्यांच्याबद्दल वाटणे स्वाभाविक आहे. त्यात आपुलकीची भर आहे हे आपल्याला माहीत आहेच.

त्यांचा आशीर्वाद दीर्घकाळ मला मिळत रहावा - त्यासाठी परमेश्वराने त्यांना आरोग्य व उदंड आयुष्य द्यावे हीच देवा-जवळ नम्र प्रार्थना.

पत्र लिहिण्यात विलंब होत आहे त्याबद्दल क्षमस्व. हार्दिक शुभेच्छा.

आपली,
स्नेहप्रभा प्रधान

स्नेहप्रभा प्रधान ह्यांचे पत्र

मुंबई २६
२६-४-८१

प्रिय आशा (धारप)

स० न० दोन्ही पत्रं मिळाली. प्रा० वि० ह० कुळकर्णी या संबंधी आठवणी लिहायला आपण सांगता आहात पण काय लिहावं हेच कळत नाही.

त्यांची आणि माझी भेट नेहमी एखाद्या व्याख्यानाच्या किवा परिसंवादाच्या निमित्तानेच होत गेली. फार - फार वर्षापूर्वी ते एकदा माझ्या घरी आले होते. 'पहिली मंगळागौर' यातील, नथ वगैरे घालून मी पूजेला बसलेली आहे, असं एक रंगीत मोठं चित्रं — फोटो — कोणत्यातरी मासिकात आलेला. ते माझ्यासाठी घेऊन आले होते. तो आजही माझ्या संग्रही आहे.

त्यांची आणि त्यांच्या ती० पत्नींची माझ्याशी नेहमी स्नेहाची, जिव्हाळ्याची वागणुक होती.

त्यांच्या पत्नी गेल्यावर मला खूप दु:ख झाले हे सांगणे नकोच.

वडील माणसांबद्दल वाटणारा आदर त्यांच्याबद्दल वाटणे सहाजिक आहे. त्यात आपुलकीची भर आहे हे आपल्याला माहीत आहेच.

त्यांचा आशीर्वाद दीर्घकाळ मला मिळत रहावा — त्यासाठी परमेश्वराने त्यांना आरोग्य व उदडांयुष्य[१] द्यावे हीच देवाजवळ नम्र प्रार्थना.

पत्र लिहीण्यात विलंब होत आहे त्याबद्दल क्षमस्व. हार्दिक शुभेच्छा.

आपली,
स्नेहप्रभा प्रधान

[१] उदंडायुष्य असा शब्द असावा.

# उषा दातार



श्री

७ एप्रिल १९८१

प्रिय सौ. आशाताई,

आपले दुसरे पत्र, विशेषतः त्यातील नम्र आज्ञा वाचून मला अक्षरशः मेल्याहून मेल्यासारखं झालं.

खरं म्हणजे ती गोष्ट माझ्या सतत स्मरणात होती. आपले मागले पत्र आले, आणि त्याच सुमाराला माझ्या यजमानांची सुरतला बदली झाली. (अजून इथले बिऱ्हाड हलवलेलं नाही.) पण मध्यन्तरी मीही त्यांच्याबरोबर सुरत डिस्ट्रिक्टमध्ये दौऱ्यावर गेले होते. तिथून सरांच्या आठवणींसंबंधीचा लेख व्यवस्थित लिहून पाठवण्याचे योजले होते. त्यासाठी आपल्या पत्त्याचे पत्र देखील बरोबर घेतलेले होते.

नंतर माझ्या लक्षात आलं की त्यांनी शिकवलेल्यापैकी नेमके संदर्भ आता माझ्या आजिबात स्मरणात नाहीत. कारण मी त्यांच्या वर्गामध्ये होते, त्याला तीस वर्षे उलटून गेली.

अर्थात् त्या त्या वेळच्या प्रतिक्रिया मात्र ठळकपणे स्मृतिकोषात मूळ धरून आहेत. आणि आता मला हवे असलेले नेमके संदर्भ त्यांच्याकडेच जाऊन विचारून घेणे आवश्यक आहे.

आता काही दिवस मी मुंबईत आहेच. तेव्हा आता लागलीच सरांच्याकडे अपॉइन्टमेन्ट घेऊन आपण दिलेल्या मुदतीत नक्की लेख पाठवते.

आपण खरोखरच एक मनोरम

परंतु प्रत्यक्ष लिहायला घेतल्या संकल्प हाती घेतला आहे. सरांच्या

उषा दातार ह्यांचे पत्र क्र० १.१



दातारांनी इंग्लिश घेऊन एम.ए.
पीएच.डी. केलेले देखील भाग्यवंत,
विद्यावंत, आपापल्या आठवणींच्या -
घागरी घेऊन सरसावले असतील,
त्यात माझ्यासारखीच्या बोंडलंभर
दुधाच्या काय पाड? तरी आपण
आस्थेने कदर केली हेच आपल्या
मोठेपणाचे द्योतक.

विलंबाबद्दल खरोखरच दिलगीर आहे. या आठवड्यात काही
करून माझा साधाभोळा लेख रवाना
करते.

कळावे. लोभ जरूर असावा.

आपली स्नेहाभिलाषिणी
सौ. उषा दातार

उषा दातार ह्यांचे पत्र क्र० १.२

श्री

७ एप्रिल १९८१

प्रिय सौ० आशाताई,

आपले दुसरे पत्र, विशेषतः त्यातील नम्र भाषा वाचून मला अक्षरशः मेल्याहून मेल्यासारखं झालं.

खरं म्हणजे ती गोष्ट माझ्या सतत स्मरणात होती. आपले मागले पत्र आले, आणि त्याच सुमाराला माझ्या यजमानांची सुरतला बदली झाली. (अजून इथले बिऱ्हाड हलवलेलं नाही.) पण मध्यन्तरी मीही त्यांच्याबरोबर सुरत डिस्ट्रिक्टमधे दौऱ्यावर गेले होते. तिथून सरांच्या आठवणींसंबंधीचा लेख व्यवस्थित लिहून पाठवण्याचे योजले होते. त्यासाठी आपल्या पत्त्याचे पत्रदेखील बरोबर घेतलेले होते.

परंतु प्रत्यक्ष लिहायला घेतल्यानंतर माझ्या लक्षात आलं की त्यांनी शिकवलेल्यापैकी नेमके संदर्भ आता माझ्या अजिबात स्मरणात नाहीत. कारण मी त्यांच्या क्लासमधे होते, त्याला तीस वर्षे उलटून गेली.

अर्थात् त्या त्या वेळच्या प्रतिक्रिया मात्र ठळकपणे स्मृतिकोषात मूळ धरून आहेत. आणि आता मला हवे असलेले नेमके संदर्भ त्यांच्याकडेच जाऊन विचारून घेणे आवश्यक आहे.

आता काही दिवस मी मुंबईत आहेच. तेव्हा आता लागलीच सरांच्याकडे अपॉइन्टमेन्ट घेऊन आपण दिलेल्या मुदतीत नक्की लेख पाठवते.

आपण खरोखरच एक मनोज्ञ संकल्प हाती घेतला आहे. सरांच्या हाताखाली इंग्लिश घेऊन एम० ए० पीएच्० डी० केलेले देखील भाग्यवंत, विद्यावंत, आपापल्या आठवणींच्या घागरी घेऊन सरसावले असतील, त्यात माझ्यासारखीच्या बोंडलंभर दुधाचा काय पाड ? तरी आपण आस्थेने कदर केली हेच आपल्या मोठेपणाचे द्योतक.

विलंबाबद्दल खरोखरच दिलगीर आहे. या आठवड्यात काही करून माझा साधाभोळा लेख रवाना करते.

कळावे. लोभ जरूर असावा.

आपली स्नेहाभिलाषिनी

सौ० उषा दातार

# अुषा देशमुख




अुषा देशमुख ह्यांचे पत्र

श्री

१२ विद्यापीठ निवास माटुंगा मुंबई
ता० ३० मे १९८३

चि० सौ० आशाताई

पुस्तक मिळाले. तुम्ही घेतलेले श्रम पानापानातून जाणवतात. रुखरुख हिच वाटली की प्रा० वि० ह० ते बघू शकले नाहीत. असो. सुटीत तुम्ही मुंबईत होता का ? भेट नाही. तुकारामाचे काम हाती घेतले असेल अशी आशा करते !

अभ्यासाला लागावे

घरी सर्वांना नमस्कार

आ०
अुषा देशमुख

# कामिनी आगासकर



A2/8, सुमन-नगर
चेंबूर, मुंबई७१
23, ६, ८३
फो. नं.
527679

॥ ॐ ॥

चि. सौ. आशा धारप यांस,

स. न. एप्रिलच्या १७ तारखेला आपली समक्ष अशी प्रथमच भेट झाली. पुस्तक-प्रत मिळाली की तुम्हांला पत्र लिहिण्याचं मनाशी ठरवलं होतं, पण तो योग लवकर आला नाही. अगदी अलीकडे प्रकाशक भाव्यांकडून प्रत हाती आली. गेल्या शुक्रवारी चि. सौ. इरावतीची भेट झाली असता विलंब का झाला ते कळलं. १७ तारखेला तुम्हांला प्रास्ताविक करतांना ऐकलं तेव्हांच पाठीवर थाप द्यावीशी वाटली, इतकं तुमचं भाषण भावपूर्ण, ओघवतं आणि नादमय ठरलं. त्यादिवशीच्या वक्त्यांना सहजसुंदर वक्तृत्व साधलं ह्याचं कारण वर्ण्य-विषय वि. ह. कुळकर्णी यांचं अजातशत्रुत्व असावं. एकूणच त्यादिवशीं कार्यक्रमानं एक आगळीवेगळी उंची गाठली. त्याचं श्रेय तुम्हांला जरूर द्यायला हवं.

कधीं मुंबईस आलांत तर तुम्हांला भेटायला मला आवडेल. फोन नंबर दिला आहे. तुमच्या सासूबाईंना माझा सादर नमस्कार सांगा — अस्तु.

आ.
कामिनी आगासकर

सौ. आशा किशोर धारप
"दुंदुभी", २४ शैलेश सोसा[यटी]
कर्वेनगर, गुळवणी महाराज
४११ ०२९
पुणे

15
पिन PIN

कामिनी आगासकर ह्यांचे पत्र

A2/8, सुमन-नगर
चेंबूर, मुंबई ७१
२३, ६, ८३
फो॰ नं॰ 527679

॥ ॐ ॥

चि॰ सौ॰ आशा धारप यांस,

स॰ न॰ एप्रिलच्या १७ तारखेला आपली समक्ष अशी प्रथमच भेट झाली. पुस्तक-प्रत मिळाली कीं तुम्हाला पत्र लिहिण्याचं मनाशी ठरवलं होतं, पण तो योग लवकर आला नाही. अगदीं अलीकडे प्रकाशक भाव्यांकडून प्रत हातीं आली. गेल्या शुक्रवारीं चि॰ सौ॰ इरावतीची भेट झाली असतां विलंब का झाला तें कळलं. १७ तारखेला तुम्हांला प्रास्ताविक करतांना ऐकलं तेव्हांच पाठीवर थाप द्यावीशी वाटली इतकं तुमचं भाषण भावपूर्ण, ओघवतं आणि नादमय ठरलं. त्यादिवशींच्या वक्त्यांना सहजसुंदर वक्तृत्व साधलं ह्याचं कारण वर्ण्य-विषय वि॰ ह॰ कुळकर्णी यांचं अजातशत्रुत्व असावं. एकूणच त्यादिवशीं कार्यक्रमानं एक आगळीवेगळी उंची गाठली. त्याचं श्रेय तुम्हांला जरूर द्यायला हवं.

कधी मुंबईस आलांत तर तुम्हांला भेटायला मला आवडेल. फोन नंबर दिला आहे. तुमच्या सासूबाईंना माझा सादर नमस्कार सांगा — अस्तु

आ॰
कामिनी आगासकर

# मोहिनी निमकर



पत्र फार उशिरा लिहित आहे.

७ नीलनंदिनी 'A'
६३ पिकिंग रोड
खार, मुंबई ५२.
१६.१२.८०.

प्रिय सौ. आशास स.न.

तुझे पत्र मिळून जवळजवळ ३ आठवडे होऊन गेले. परंतु तू केलेल्या स्तुतीने मी आजपर्यंत हरभऱ्याच्या झाडावर जाऊन बसले होते. तेथून उतरण्यास इतके दिवस लागले..... पण जरा बाजूला ठेवून खरं कारण असं होतं की तुझं पत्र आले त्या सुमारास माझी मुलगी खूप आजारी होती. ताप, पोटदुखणे, उलट्या सर्व प्रकार सुरू होते. ३ दिवस हॉस्पिटलमध्येही ठेवावी लागली. त्याच्याबरोबर येणाऱ्या सर्वांच्या tests... यातून बाहेरच पडता येईना. शिवाय घरात कामाची कुणी माणसं नव्हती. त्यामुळे उशीर झाला. रागावू नको.

प्रो. वि. ह. कुलकर्णी यांच्याविषयी आत्यंतिक आदर बाळगून असलेली जी कांही मंडळी आहेत त्यांपैकीच मी एक आहे. त्यांची स्वच्छ विचारसरणी, प्रत्येक व्यावहारिक प्रसंगाविषयी शिस्तबद्ध आखणी, वाणीचा स्पष्टवक्तेपणा, वेळप्रसंगी सडेतोड भाषा आणि त्यांच्या घरातील संस्कारी वातावरण या साऱ्याच मला आजवर जाणवलेल्या गोष्टी आहेत. अर्थात मी त्यांची विद्यार्थिनी कधीच नव्हते. परंतु ६०-६१ साली मुंबईत ज्या वक्तृत्वस्पर्धांमध्ये मी भाग घेत होते त्यावेळी मला त्यांनी अनेकदा मार्गदर्शन केले. तेव्हापासून ऋणानुबंध वाढला. शिवाय कै. सौ. कुलकर्णी यांचे माझ्याशी बोलणे चालणे इतके प्रेमाचे होते असे की "तुझ्याकडे आले की माहेरी आल्यासारखं वाटतं" असं मी नेहमी त्यांना म्हणायची.

परंतु "[illegible]" लेखांत वाहून गेलेला प्रसंग जो तुला हवा आहे, तसा खास महत्त्वाचा नाही. एक आठवण आहे ती अशी की दादर भगिनी समाजाच्या गणपतीउत्सवात "स्त्रियांना विनोदबुद्धी असते का नसते?" अशा विषयावर परिसंवाद होता आणि मी व वि. ह. हे परस्पर विरोधी गटांतून बोलले होतो. माझ्या भाषणात मी मंगळागौरीच्या रात्रीच्या गंमती, उखाणे, विहिणीविहिणींच्या झगड्यांच्या वेळचे उखाणे, यजमानांचे नांव घेताना त्याला अनेकदा लागणारी

मोहिनी निमकर ह्यांचे पत्र क्र० १.१

७ नीलनंदिनी 'A'
६३ लिंकिंग रोड
खार, मुंबई ५२

प्रिय सौ० आशास स० न० १६.१२.८०

तुझे पत्र मिळून जवळजवळ ३ आठवडे होऊन गेले. परंतु तूं केलेल्या स्तुतीनें मी आजपर्यंत हरभऱ्याच्या झाडावर जाऊन बसले होते. तेथून उतरण्यास इतके दिवस लागले... थट्टा जरा बाजूला ठेवून खरं कारण असं झालं कीं तुझं पत्र आलं त्या सुमारास माझी मुलगी खूप आजारी होती. ताप, पोट दुखणे, उलट्या सर्व प्रकार सुरू होते. ३ दिवस हॉस्पिटलमध्येही ठेवावी लागली. त्याच्यापाठोपाठ येणाऱ्या सर्वतऱ्हेच्या tests... यांतून बाहेरच पडता येईना. शिवाय घरांत कामाची कुणी माणसं नव्हती. त्यामुळे उशीर झाला. रागावू नको.

प्रो० वि० ह० कुळकर्णी यांचेविषयी आत्यंतिक आदर बाळगून असलेली जी कांहीं मंडळी आहेत त्यापैकीच मी एक आहे. त्यांची स्वच्छ विचारसरणी, प्रत्येक बारिकसारिक प्रसंगातील शिस्तबद्ध आखणी, वाणीचा स्पष्टवक्तेपणा, वेळप्रसंगी सडेतोड भाषा आणि त्यांच्या घरांतील संस्कारी वातावरण या साऱ्याच मला आजवर जाणवलेल्या गोष्टी आहेत. अर्थात मी त्यांची विद्यार्थिनी कधीच नव्हते. परंतु ६०-६१ साली मुंबईत ज्या वक्तृत्व स्पर्धांमध्ये मी भाग घेत होते त्यावेळी मला त्यांनी अनेकदा मार्गदर्शन केलं. तिथून ऋणानुबंध वाढला. शिवाय कै० सौ० कुळकर्णी यांचे माझ्याशी बोलणे चालणे इतके प्रेमाने होत असे कीं "तुमच्याकडे आलं कीं माहेरी आल्यासारखं वाटतं" असं मी नेहमी त्यांना म्हणायची.

परंतु एखादा लक्षांत राहून गेलेला प्रसंग जो तुला हवा आहे, तसा खास माझ्याजवळ नाही. एक आठवण आहे ती अशी कीं दादर भगिनी समाजाच्या गणपती उत्सवांत "स्त्रियांना विनोदबुद्धी असते का नसते?" अशा विषयावर परिसंवाद होता आणि मी व वि० ह० हे परस्पर विरोधी गटांतून बोललो होतो. माझ्या भाषणांत मी मंगळागौरीच्या रात्रीच्या गमती, उखाणे, विहणीविहिणींच्या फुगड्यांच्या वेळचे उखाणे, यजमानांचे नांव घेताना त्याला अनेकदा लागणारी विनोदाची झालर वगैरे अनेक उदाहरणे देऊन स्त्रीच्या विनोदबुद्धीचे समर्थन केले होते. हशा पिकला. परंतु मी निवडलेली बहुतेक उदाहरणे अशी होती समोरचीच्या जिव्हारी झोंबणारी होती.

वि० ह० बोलायला उभे राहिले आणि माझीच उदाहरणे घेऊन त्यांनी स्पष्ट केलं कीं — "आम्हांला हेच म्हणायचं आहे कीं स्त्रियांना समोरचीला दुखावल्याखेरीज चैन पडत नाही. त्यांच्यात खिलाडूवृत्ती — sporting spirit नसते. तुम्ही तुमच्याच भाषणावरून हे सिद्ध केलं आहे." सौ० सरोजिनी वैद्यने कृत्तिकेच्या तोंडच्या विनोदी म्हणी उल्लेखिल्या होत्या. पण वि० हंनी क्षणार्धात स्पष्ट केलं की कृत्तिकेच्या तोंडची भाषा ही देवलांची होती. आमची त्यादिवशी सपशेल जिरली होती. अर्थात हसताखेळतां.

या प्रसंगाविषयी तुला विस्ताराने कांहीं हवे असेल तर १० तारखेला मी एक दिवसाकरता पुण्याला येत आहे. तेव्हां बोलूं. जरूर कळव. दुसरा कांहीं खास प्रसंग माझ्याजवळ नाही. आठवल्यास पुन्हा पत्र टाकीन. विवेकानंदांवरच्या पुस्तकांविषयीही १० ता० ला०[१] बोलूं. तू त्यावेळी पुण्यात आहेस कां ? माझा गाण्याचा कार्यक्रम आहे. जरूर ये. पुन्हां सविस्तर कळवते. श्री० धारप यांस न० मुलांना आ० तुझी सौ० मोहिनी निमकर

फुगड्यांच्यावेळी घेतले जाणारे जुन्यावेळचे उखाणे बहुधा उणेदुणे काढणारे असत[२].

पत्र फार घाईत लिहलं आहे[३].

---

[१] ला नंतर संक्षेपचिन्हाची आवश्यकता नाही.

[२] ही ओळ पत्रात दुसऱ्या पृष्ठावर समासात आडवी लिहिली आहे.

[३] ही ओळ पहिल्या पृष्ठावर सर्वात वरती लिहिली आहे. बहुधा जागा न पुरल्याने



॥ श्री ॥

७ नीलनंदिनी 'A'
६३ लिंकिंग रोड,
खार – मुंबई ५२.
१८.४.८३.

प्रिय सौ. आशाबाई, स.न.

अगदी मनापासून केवळ तुझी पाठ थोपटण्यासाठीच हे पत्र लिहीत आहे. रविवार दि. १७.४.८३ रोजी ग्रंथसंग्रहालयातील प्रकाशन-समारंभ आटोपला आणि अत्यंत भारावलेल्या मनःस्थितीत मी घरी परत आले. अर्थात अशातऱ्हेनं भारावून जाण्याला अनेक कारणं होती. अत्यंत नेटनेटका आटोपशीर समारंभ, तुझं — प्रास्ताविकातलं आणि आभाराचं भाषण, वक्त्यांची उत्तम निवड आणि जमलेल्या सर्व मंडळींचं वि.ह. वरील प्रेम — या साऱ्याचा असा काही उत्तम मिलाफ जमला होता की २-२॥ तास कसे गेले हे समजलेही नाही. "तूं अतिशय सुंदर बोलतेस" असं आजपर्यंत अनेकजणांकडून ऐकलं होतं. परंतु प्रत्यक्ष भाषण ऐकण्याचा अजून योग आला नव्हता. तो सुरेख अनुभव परवा चाखला. तुझ्या [illegible] सोज्वळ भाव, शब्दांची अचूक निवड आणि वाणीतला आत्मविश्वास हे सारं दर वाक्यागणिक जाणवत होतं. कुठे घाई नाही गडबड नाही. कसं अगदी ओघवतं वक्तृत्व सुरू होतं. अतिशय आवडलं मला! म्हणजे सगळी तूंच आवडलीस. संबंध कार्यक्रमाच्या मागचे परिश्रम सतत जाणवत होते आणि त्या यशस्वी समारंभात तुझा वाटा सिंहाचा होता हे कुणीही सांगेल. तेव्हां तूं कितीही विनय दाखवलेस तरी त्याचं श्रेय तुला स्वीकारावंच लागेल.

या सगळ्या समारंभात वि.ह.ची अनुपस्थिती खरोखरच फार जाणवली. परंतु कांही कांही योग नसतात हेच खरं. सौ. इरावतीनेही अतिशय समर्पक शब्दांत कृतज्ञता व्यक्त केली. —— पुन्हां एकदां मनःपूर्वक अभिनंदन.

येत्या शुक्रवारी संध्याकाळी मी पुण्याला येत आहे. त्या दिवशी रात्रौ ७-७॥ ला किंवा दुसऱ्या दिवशी सकाळी तुझ्याकडे येण्याचं मनांत आहे. पाहू कसं काय जमतं ते! रविवारी मी लगेच परत येणार आहे.

माझ्या मनांत आशा, आपण दोघी मिळून करा

मोहिनी निमकर ह्यांचे पत्र क्र० २.१




मोहिनी निमकर ह्यांचे पत्र क्र० २.२

॥ श्री ॥

७ नीलनंदिनी 'A'
६३ लिंकिंग रोड
खार — मुंबई ५२
१८.४.८३

प्रिय सौ० आशास, स० न०

अगदी मनापासून केवळ तुझी पाठ थोपटण्यासाठीच हे पत्र लिहीत आहे. रविवार दि० १७.४.८३ रोजी ग्रंथसंग्रहालयातील प्रकाशन-समारंभ आटोपला आणि अत्यंत भारावलेल्या मनःस्थितीत मी घरी परत आले. अर्थात अशातऱ्हेनं भारावून जाण्याला अनेक कारणं होती. अत्यंत नीटनेटका आटोपशीर समारंभ, तुझं प्रास्ताविकाचं आणि आभाराचं भाषण, वक्त्यांची उत्तम निवड आणि जमलेल्या सर्व मंडळींचं वि० हं वरील प्रेम — या साऱ्याचा असा कांही उत्तम मिलाफ जमला होता की २-२॥ तास कसे गेले हे समजलंही नाही. "तू अतिशय सुंदर बोलतेस" असं आजपर्यंत अनेकजणांकडून ऐकलं होतं. परंतु प्रत्यक्ष भाषण ऐकण्याचा अजून योग आला नव्हता. तो सुखद अनुभव परवा चाखला. तुझ्या चेहऱ्यावरचा सोज्वळ भाव, शब्दांची अचूक निवड आणि वाणीतला आत्मविश्वास हे सारं दर वाक्यागणिक जाणवत होतं. कुठे घाई नाही गडबड नाही. कसं अगदी ओघवतं वक्तृत्व सुरु होतं. अतिशय आवडलं मला! म्हणजे सगळी तूंच आवडलीस. सबंध कार्यक्रमाच्या मागचे परिश्रम सतत जाणवत होते आणि त्या यशस्वी समारंभांत तुझा वाटा सिंहाचा होता हे कुणीही सांगेल. तेव्हां तूं कितीही विनय दाखवलास तरी त्याचं श्रेय तुला स्वीकारावच लागेल.

या सगळ्या समारंभांत वि० हं० ची अनुपस्थिती खरोखरच फार जाणवली. परंतु कांहीं कांहीं योग नसतात हेंच खरं. सौ० इरावतीनेंही अतिशय समर्पक शब्दांत कृतज्ञता व्यक्त केली. — पुन्हां एकदां मनःपूर्वक अभिनंदन.

येत्या शुक्रवारी संध्याकाळी मी पुण्याला येत आहे. त्या दिवशी रात्री ७-७॥ किंवा दुसऱ्या दिवशी सकाळी तुझ्याकडे येण्याचं मनांत आहे. पाहू कसं काय जमतं ते! रविवारी मी लगेच परत येणार आहे.

माझ्या मनांत आशा, आपण दोघी मिळून करू शंकूं अशा कांही कल्पना आहेत. प्रत्यक्षांतच सर्व सांगते. घरातील वडील मंडळीना व श्री० किशोर धारप यांना न० मुलांना अ० आ०

तुझी,
सौ० मोहिनीताई

इतकी हुशार आणि सद्गुणी बायको आपली या कल्पनेनं श्री० धारपही बहुधा 7th heaven मध्ये असणार! त्यांचंही अभिनंदन. कारण पुरुषांच्या पाठिंब्याशिवाय कधी बाईचं कर्तृत्व फुलून येत नाही.

# गिरिजा कीर



॥ श्री ॥

सौ. गिरिजा कीर

पाच झपूर्झा, साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.

१२-१०-८०.

सौ. आशा धारप

स.न.

पत्र मिळाले. मी जरूर आठवणी पाठवेन. ३० ता. पर्यंत साहित्य आपल्या हाती असेल.

आपण एक चांगले काम हाती घेतले आहे. हे आपलेच नव्हे तर साहित्यावर प्रेम करणाऱ्या आम्हा सर्व विचारवंतांचं काम आहे. मी सुयश चिंतिते.

कळावे.

आ.

गिरिजा कीर

गिरिजा कीर ह्यांचे पत्र क्र० ०१

॥ श्री ॥

सौ० गिरिजा कीर पाच झपुर्झा, साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व) मुंबई ४०० ०५१

१२-१०-८०

सौ० आशा धारप

स० न०

पत्र मिळालं. मी जरूर आठवणी पाठवेन. ३० ता० पर्यंत साहित्य आपल्या हाती असेल.

आपण एक चांगलं काम हाती घेतलं आहे. हे आपलंच नव्हे तर सरांच्यावर प्रेम करणाऱ्या आम्हा सर्व विद्यार्थ्यांचं काम आहे. मी सुयश चिन्तिते.

कळावे.

आ०

गिरिजा कीर



॥ श्री ॥

सौ. गिरिजा कीर

पाच झपूर्झा, साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.

२८-११-८०.

सौ. आशा धारप

स.न.

आपल्याला कबूल केल्याप्रमाणे सरांच्या आठवणींचा लेख आज रोजी त्यांच्याकडे पोचवला. लेख एका बैठकीत छान मुद्देसूद लिहिला गेला. तुम्ही पत्र पाठवून माझ्याकडून लिहवून घेतलात. हे फार बरे केलेत. आपल्याकडे लेख येईलच.

आपणास छायाचित्र लागेल काय? माझ्या संग्रही एक-दोन आहेत.

कळावे. शुभेच्छांसह,

तुझी

गिरिजा कीर

गिरिजा कीर ह्यांचे पत्र क्र० ०२

॥ श्री ॥

सौ० गिरिजा कीर पाच झपुर्झा, साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व) मुंबई ४०० ०५१

२८-११ -८०

सौ० आशा धारप

स० न०

आपल्याला कबूल केल्याप्रमाणे सरांच्या आठवणींचा लेख आज रोजी त्यांच्याकडे पोचवला. लेख एका बैठकीत छान 'मूड' मधे लिहिला गेला. तुम्ही पत्र पाठवून माझ्याकडून लिहवून घेतलात हे फार बरं झालं. आपल्याकडे लेख येईलच

आपणास छायचित्र लागेल काय? माझ्या संग्रही एक-दोन आहेत.

कळावे. शुभेच्छासंह,

आ०

गिरिजा कीर

# पु० ल० देशपांडे



पु० ल० देशपांडे ह्यांचे पत्र

पुणे ४

स० न०

‘अॅज यू लाइक हिम’ हे प्रा० वि० ह० कुळकर्णी ह्यांच्या आठवणींचं पुस्तक मला भेट म्हणून पाठवल्याबद्दल मनःपूर्वक धन्यवाद. ह्या पुस्तकाच्या निर्मितीची जबाबदारी स्वीकारून तुम्ही तुमच्या गुरुंचं ऋण फेडायचा हृद्य प्रयत्न केला आहे. त्यांच्या हयातीतच जर हा गौरवग्रंथ प्रकाशित झाला असता तर अधिक चांगले झाले असते. पण संकल्प आपल्या हाती असला तरी सिद्धी सर्वस्वी आपल्या हाती नसते.

एकच विचारतो. पुस्तकाचे नाव इंग्रजी का ठेवलेत? नुसते ‘विठ्ठलराव’ म्हटले असतेत तरी त्यांच्या साधेपणाला साजेसं दिसलं असतं. त्यांचे सर्व परिचित त्यांना ‘विठ्ठलराव’ म्हणूनच आठवत असत. असो. ‘नावाला’नाव ठेवण्याचा हेतु नाही पण आपल्या मराठी पुस्तकाला इंग्रजी नाव नसावं असं मला वाटतं म्हणून लिहिलं. राग नसावा.

पु० ल० देशपांडे

# रा० चिं० ढेरे



रामचंद्र चिंतामण ढेरे

'लोककल्याण', ७७ शनिवार पेठ, निरंजन माधव मार्ग, पुणें ३०

॥श्री॥

९ ऑगस्ट १९८३

सौ. आशाताई धारप,

सस्नेह नमस्कार.

- आपलं २८ जुलैचं अभिनंदन-पत्र अन् त्यासोबत आपण भेट म्हणून दिलेलं 'अ‍ॅज यू लाइक हिम' हे पुस्तक श्री. भाऊंकडून वेळीच मिळालं होतं. प्रकृतीचं अस्वास्थ्य अन् नेहमीचे व्याप यांमुळे उत्तर वेळेवर पाठवू शकलो नाही, याबद्दल दिलगीर आहे.
- आपलं जिव्हाळ्यानं भारलेलं पत्र वाचून समाधान वाटलं. विशेषतः आपण संपादित केलेलं पुस्तक प्रकाशित झाल्यानंतर अवघ्या तीनच दिवसांनी आपण त्यावर स्वाक्षरी केलेली आहे, हे पाहून आनंद झाला. गुणज्ञ रसिकांची उत्कट पावती हेच कोणाही लेखकाच्या कामातं खरं सार्थक असतं. त्याचं खडतर वाटचालीतलं बळ टिकून राहतं, तेहि गुणज्ञांच्या या सहज सहयोगामुळेच. आपला मी ऋणी आहे.
- प्रा. वि. ह. कुलकर्णी यांच्याविषयीच्या आठवणींचं नेटकं संपादन करून आपण जे गुरुपूजन केलं आहे, ते हृद्य आहे. प्रा. कुलकर्णी हे पहायला हयात असते, तर त्यांच्या प्रसन्न आशीर्वादांच्या वृष्टीनं आपलं मस्तक निश्चितच डवरलं असतं, असं मला वाटत राहिलं. साहित्य-साधनेचं हे व्रत आपण अर्ध्यावर सोडू नये, असं मी सुचवलं - तर आपण ते औद्धत्य मानणार नाही, असा विश्वास आहे.
- श्री. धारप यांना माझा नमस्कार सांगावा. मुलांना आशीर्वाद.
- कळावे.

आपला,
रामचंद्र चिंतामण ढेरे

रा० चिं० ढेरे ह्यांचे पत्र

‘लोककल्याण’, ७७ शनिवार पेठ, निरंजन माधव मार्ग, पुणें ३०
९ ऑगस्ट १९८३

॥ श्री ॥
सौ० आशाताई धारप,
सस्नेह नमस्कार.

- आपलं २८ जुलैचं अभिनंदन-पत्र अन् त्यासोबत आपण भेट म्हणून दिलेलं ‘अ‍ॅज् यू लाईक हिम्’ हे पुस्तक श्री० भाऊंकडून वेळीच मिळालं होतं. प्रकृतीचं अस्वास्थ्य अन् नेहमीचे व्याप यांमुळे उत्तर वेळेवर पाठवू शकलो नाही, याबद्दल दिलगीर आहे.

- आपलं जिव्हाळ्यानं भारलेलं पत्र वाचून समाधान वाटलं. विशेषत: आपण संपादित केलेलं पुस्तक प्रकाशित झाल्यानंतर अवघ्या तीनच दिवसांनी आपण त्यावर स्वाक्षरी केलेली आहे, हे पाहून आनंद झाला. गुणज्ञ रसिकांची उत्कट पावती हेच कोणाहि लेखकाच्या कामाचं खरं सार्थक असतं. त्याचं खडतर वाटचालीतलं बळ टिकून राहतं, तेहि गुणज्ञांच्या या सहज सहयोगामुळेच. आपला मी ऋणी आहे.

- प्रा० वि० ह० कुळकर्णी यांच्याविषयीच्या आठवणींचं नेटकं संपादन करून आपण जे गुरुपूजन केलं आहे, ते हृद्य आहे. प्रा० कुळकर्णी हे पहायला हयात असते, तर त्यांच्या प्रसन्न आशीर्वादांच्या वृष्टीनं आपलं मस्तक निश्चितच डवरलं असतं, असं मला वाटत राहिलं. साहित्य-साधनेचं हे व्रत आपण अर्ध्यावर सोडू नये, असं मी सुचवलं, तर आपण ते औद्धत्य मानणार नाही, असा विश्वास आहे.

- श्री० धारप यांना माझा नमस्कार सांगावा. मुलांना आशीर्वाद.

- कळावे.

आपला,
रामचंद्र चिंतामण ढेरे

# मंगला निगुडकर



सुखदा
१२६ विवेकानंद रोड
श्री. खार. मुंबई ५२.

सौ. आशाताई यांस,
स. न. वि. वि.

आपण पाठवलेले पुस्तक मिळाले. त्याबद्दल आभारी आहे. मी स्वतः कै. वि. द. कुलकर्णींना ओळखत नव्हते. परंतु पुस्तक प्रकाशनाच्या दिवशी त्यांच्या विषयी अनेक वक्ते जे बोलले ते ऐकून त्यांच्याविषयी उत्सुकता खूप वाटली. व सौ ताईंना (फडणीस) 'तुमचे वाचून झाल्यावर ते पुस्तक मला वाचायला द्या' असे मी त्यांना सांगितले होते.

काल पुस्तक मिळाल्याबरोबर त्यातले अनेक जणांचे लेख वाचून काढले व ते फार आवडले. एकदोन दिवसात संपूर्ण वाचून होईल.

आपण मला आपले पुस्तक पाठवले पण मी मात्र माझे पुस्तक देऊ शकले नाही याबद्दल क्षमस्व. मला किर्लोस्करांनी फक्त १० पुस्तके पाठवली. माझी चार भावंडे, कै. माधवरावांची चार भावंडे यांतच ८ संपली, एक सौ ताईंना दिले व एकच माझ्या

मंगला निगुडकर ह्यांचे पत्र क्र० १.१



कडे ठरले आहे. आपल्याला कादंबरीवजा चरित्राची आवड आहे का नाही माहित नाही. परंतु सौ. ताईकडचे cheaper by the dozen हे पुस्तक आपण वाचल्यास व अभिप्राय कळवल्यास मला बरे वाटेल.

१५ ऑगष्टला सौ मेधाकडे मुलींचा वाढदिवस व सौ. अनघाचे डोहाळजेवण आहे. त्यानंतर मला वाटते 23 तारखेला पनवेलला आहे. तेव्हा भेट होईलच.

आपल्याकडील वडील मंडळींस नमस्कार. लहानांस आशीर्वाद.

कळावे.

कं

मंगला निगुडकर

२-८-१९८३.

मंगला निगुडकर ह्यांचे पत्र क्र० १.२

सुखदा
१२६ विवेकानंद रोड
खार. मुंबई ५२.

श्री०
सौ० आशाताई यांस,
स० न० वि० वि०

आपण पाठवलेले पुस्तक मिळाले. त्याबद्दल आभारी आहे. मी स्वत: कै० वि० ह० कुळकर्णींना ओळखत नव्हते. परंतू पुस्तक प्रकाशनाच्या दिवशी त्यांच्याविषयी अनेक वक्ते जे बोलले ते ऐकून त्यांच्याविषयी उत्सुकता खूप वाटली व सौ० ताईंना (फडणीस) 'तुमचे वाचून झाल्यावर ते पुस्तक मला वाचायला द्या' असे मी त्यांना सांगितले होते.

काल पुस्तक मिळाल्याबरोबर त्यातले अनेक जणांचे लेख वाचून काढले व ते फार आवडले. एकदोन दिवसात संपूर्ण वाचून होईल.

आपण मला आपले पुस्तक पाठवले. पण मी मात्र माझे पुस्तक देऊ शकले नाही याबद्दल क्षमस्व. मला किर्लोस्करांनी फक्त १० पुस्तके पाठवली. माझी चार भावंडे, कै० माधवरावांची चार भावंडे यांतच ८ संपली, एक सौ० ताईंना दिले व एकच माझ्याकडे उरले आहे. आपल्याला कादंबरीवजा चरित्राची आवड आहे का नाही हे माहित नाही. परंतु सौ० ताईंकडचे 'cheaper by the dozen' हे पुस्तक आपण वाचल्यास व अभिप्राय कळवल्यास मला बरे वाटेल.

१५ ऑगष्टला सौ० मेधाकडे मुलींचा वाढदिवस व सौ० अनघाचे डोहाळेजेवण आहे. त्यानंतर मला वाटते २३ तारखेला पनवेलला आहे. तेव्हा भेट होईलच.

आपल्याकडील वडील मंडळींस नमस्कार. लहानांस आशिर्वाद

कळावे.

आ०
मंगला निगुडकर
९-८-१९८३

# आनंद साधले



हैदराबाद २९
१५.४.८३

सौ. आशा [illegible]
यांस स.न.वि.वि.

तुमचे धारचे पत्र मिळाले. विद्यापीठ आनंदाच्या पेक्षाही वैयक्तिक प्रमाणे फार आनंद झाला. हे काम पूर्ण होईल अशी अपेक्षा नव्हती. त्याच्या पूर्ततेत तुमचा मोठाच गौरव आहे. तुम्ही किती कष्ट घेतले असतील त्याची मला कल्पना आहे.

या वेळी तुमचा समारंभ चालू आहे. मी मनोमन तिथे आहेच. कृपया पुस्तकाची एक प्रत V.P. ने मला ताबडतोब पाठवावी. मी V.P. सोडवून घेईन.

पुन्हा एकदा अभिनंदन. कळावे,
आनंद साधले

आनंद साधले ह्यांचे पत्र क्र० ०१

हैदराबाद २९
१७.४.८३

सौ० आशा धारप
यांस स० न० वि० वि०

तुमचे ६/४ चे पत्र मिळाले. छापिल आमंत्रणापेक्षाही वैयक्तिक पत्राने फार आनंद झाला. हे काम पूर्ण होईल अशी अपेक्षा नव्हती. त्याच्या पूर्ततेत तुमचा मोठाच गौरव आहे. तुम्ही किती कष्ट घेतले असतील त्याची मला कल्पना आहे.

याक्षणी तुमचा समारंभ चालू आहे. मी मनोमन तिथे आहेच. कृपया पुस्तकाची एक प्रत V.P. ने मला ताबडतोब पाठवावी. मी V.P. सोडवून घेईन.

पुन्हा एकदा अभिनंदन

विनीत
आनंद साधले



सौ. उषा आरध्ये [illegible]  हैदराबाद २९ / ३१/५/८३
यांस-
साविनय नमस्कार.
वि.वि. —
तुमचे ३/५ चे पत्र मिळाले. कार्यक्र-मांचे नीट तुम्ही लिहलेल्या विस्ताराने व सुंदर वर्णनाने मला अत्यंत आनंद वाटला. मी [illegible] बघितला होता. त्यावेळी सौ. [illegible] भेटल्या होत्या. त्यांनीही स्वतःच्या [illegible] सर्व कौतुक केले.
मी तुम्हां सर्व मंडळींचे कौतुक करतो. अभिनंदनही. विशेषतः तुमचे. कारण अशा योजना नेहमी नीट Planning आणि [illegible] यांच्या अभावाने बारगळतात. तुमच्या हातात हे सर्व झाले. तुम्ही गौरव, धन्यता व अभिमान यांच्या अधिकारी झालात.
पुस्तकाचे नावही [illegible] Professor होतो त्या वृत्तीने अत्यंत

सौ. आशा [illegible] / [illegible] महाराष्ट्र [illegible] / POONA 4 / 411004

[illegible] आहे. या सर्व सुगंधांची जागा इथे स्मरण होत राहील. कुलकर्णी गेले ते तुमच्या प्रयत्नांनी दीर्घजीवी झाले आहेत. असे विद्यार्थी ज्याला मिळतात तो गुरु धन्य होय. चिरंजीव होय.
मी पुन्हा एकदा तुमचे कौतुक करतो. पुस्तक अजून मिळालेले नाही.
विनीत [illegible]

आनंद साधले ह्यांचे पत्र क्र० ०२

हैदराबाद २९
११/५/८३

सौ० आशा धारप यांस-
सविनय नमस्कार.
वि० वि०

तुमचे ५/५ चे पत्र मिळाले. कार्यक्रमाचे चित्र तुम्ही एवढ्या विस्तारानें व सुंदर वर्णिलेत त्यांना[१] अत्यंत आनंद वाटला. मी ८/५/८३ ला मुंबईला होतो. त्यावेळी सौ० इरावती भेटल्या होत्या. त्यांनीही (स्वतःच्या चहाचे वगळून) इतर सर्व कौतुक केले.

मी तुम्हा सर्व मंडळीचे कौतुक करतो. अभिनंदनही. विशेषतः तुमचे. कारण अशा योजना नेहमी नीट planning आणि द्रव्य यांच्या अभावाने बारगळतात. तुमच्याच श्रमाने हे सर्व झाले. तुम्ही गौरव, धन्यता व अभिमान यांच्या अधिकारी झालात.

पुस्तकाचे नावही अण्णा इंग्रजीचे professor होते त्या दृष्टीने अत्यंत युक्त आहे. या सर्व सुंगधांची[२] जाण इथे सतत होत राहील.

कुळकर्णी गेले ते तुमच्या प्रयत्नांनी दीर्घजीवी झाले आहेत. असे विद्यार्थी ज्यांना मिळतात ते गुरू धन्य होत. चिरंजीव होत.

मी पुन्हा एकदा तुमचे कौतुक करतो.

पुस्तक अजून मिळालेले नाही.

विनीत
आनंद साधले

[१] त्यानं/ त्याने?
[२]सुगंधाची

# ताराबाई वैद्य



सौ. ताराबाई वैद्य

**VAIDYA AND ASSOCIATES**
**Textile and Management Consultants**

3rd floor, Navsari Chambers,
Sir Purshottumdas Thakurdas Marg,
Bombay 400 001.
Cable : VAINACONS
Telex 011-3770 GNCO IN

॥ श्री ॥

चि. सौ. आशाताईंना अनेक आशिर्वाद.

२ दिवसांपूर्वी तुम्ही रजिस्टर्ड पोस्टानें पाठविलेली As you like him ह्या ह्या पुस्तकाची प्रत मिळाली. इतके व्याप सांभाळून आपला विशेष परिचय नसतांनासुध्दां आपण आदरपूर्वक धाडलेलें पुस्तक पाहून जरा नवल वाटलें. परंतु आदरपूर्वक ह्या शब्दांतून आपल्याला वडिल जनांबद्दल वाटणारा आदर व्यक्त झाला त्याबद्दल कौतुकासह धन्यवाद.

माझी स्नुषा सौ. सुचेता (संजीवनी) हिचे व आपले नणंद भावजय हें नातें त्या भेटीमागें आहेच. आतां ह्या निमित्तानें झालेल्या ओळखीनें परिचय वाढून स्नेहसंबंध वृध्दिंगत व्हावेत हीच मनापासून इच्छा आहे.

कै. वि. ह. कुळकर्णी हे शिवाजी पार्कचे रहिवासी. त्यांच्या पत्नी कै. सौ. इंदिराबाई यांची व माझी वनिता समाजांतील ओळख व नंतर दृढ मैत्री झाली व पुष्कळ वेळां कांही ना कांही कारणानें एकमेकींकडे जाणें येणें होऊन परिचय वाढला समाजांतील मनमोकळ्या व खेळीमेळीच्या वातावरणांत व सहलींच्या वेळी स्वभाव विशेष जमले. दरवर्षी आम्ही नवी कविता योजून दिवाळी शुभचिंतन कार्डे मित्रमैत्रिणी व नातेवाईकांना पाठवितो. मुद्दाम नमूद करावेसे वाटतें कीं, त्या ४ ओळींच्या कवितेबद्दल श्री विठ्ठलराव आपला मार्मिक अभिप्राय कळवून पत्रोत्तर पाठवून कौतुक करीत असत.

तुमच्याकडून आलेल्या पुस्तकांतील बहुतेक सर्व लेख वाचले. श्री. रा. भि. जोशी, सौ. सुधाताई जोशी, श्री सोमण, श्री. माधव मनोहर, सौ. गिरिजा कीर, सौ. मोहिनी निमकर, श्री. रा. को. फाटक, श्री. वा. रा. ढवळे, सौ सुमति देवस्थळे, श्री. बाळ कुडतरकर, श्री. व. दि. कुळकर्णी, मनोरमा फडके, सौ. उषा दातार

Registered Office : 36, Goodwill Building, Woollen Mill Lane, Bombay 400 016. Tel. : 46 87 13

ताराबाई वैद्य ह्यांचे पत्र क्र० १.१



सौ. आशा परचुरे वगैरे विविध क्षेत्रांतील मान्यवर मंडळींनीं व विद्यार्थी वर्गानीं श्री. वि. ह. यांच्यासारख्या चतुरस्र व अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाबद्दल कांहीं अपेक्षा ठेवून केलेलें लेखन अत्यंत वाचनीय व मार्मिक आहे. ह्या सर्व मंडळींनीं लेख देऊन आपल्याला मोलाचें साह्य केलें.

आपण हे पुस्तक संपादित करून साहित्य क्षेत्रांत एका मौलिक पुस्तकाची भर घातली आहे असें म्हटल्यावांचून रहावत नाहीं. एकाच गोष्टी बद्दल हळहळ वाटली कीं वि. ह. च्या देखत या पुस्तकाच्या प्रकाशनाचा योग आला नाहीं. आपणाहि आपल्या मनोगतांत याचा उल्लेख केला आहेच.

श्री. प्रकाश मोहाडीकर यांच्या पुढाकारानें दादरच्या कांहीं व्यक्ति व संस्थांनीं श्री. वि. ह कुळकर्णी यांचा अमृतमहोत्सव बालमोहन विद्यामंदिरांत आयोजिला होता. त्यावेळीं आमच्या वनिता समाजातर्फे कार्यकारी मंडळाच्या संमतीनें गौरवगीत मी करून दिलें होतें. या समारंभाच्यावेळीं ५ सुवासिनी ओवाळणार होत्या त्यांत सहभागी होण्याची संधि मला मिळाली हा एक सुयोगच म्हणायचा!

आम्ही पुढील आठवड्यांत कोथरूडला माझ्या मोठ्या सुनेकडे येणार आहोंत. तिथें आल्यावर तुम्हांला कळवीनच. आपण तेथें जरूर यावें.

थोर मंडळींस नमस्कार. लहानांस सप्रेम आशीर्वाद.

कळावें लोभ आहेच तो वृध्दिंगत व्हावा ही इच्छा.

आपली स्नेहेच्छु

सौ. ताराबाई वैद्य

ताराबाई वैद्य ह्यांचे पत्र क्र० १.२

सौ० ताराबाई वैद्य


VAIDYA AND ASSOCIATES 3rd floor, Navsari Chambers,

Sir Purushottumdas Thakurdas Marg

Textile and Management Consultants Bombay, 400 001

Cable : VAINACONS

Telex 011-3770 GNCO IN


॥ श्री ॥

चि० सौ०आशाताईंना अनेक आशिर्वाद

२ दिवसांपूर्वी तुम्ही रजिस्टर्ड पोस्टाने पाठविलेली As you like him ह्या पुस्तकाची प्रत मिळाली. इतके व्याप सांभाळून आपला विशेष परिचय नसतांनासुद्धा आपण आदरपूर्वक धाडलेलें पुस्तक पाहून जरा नवल वाटलें. परंतु आदरपूर्वक ह्या शब्दांतून आपल्याला वडिल जनांबद्दल वाटणारा आदर व्यक्त झाला झाला त्याबद्दल कौतुकासह धन्यवाद.

माझी स्नुषा सौ० सुचेता (संजीवनी) हिचे व आपलें नणंद भावजय हें नातें त्या भेटीमागें आहेच. आतां ह्या निमित्तानें झालेल्या ओळखीनें परिचय वाढून स्नेहसंबंध वृद्धिंगत व्हावेत हीच मनापासून इच्छा आहे.

कै० वि० ह० कुळकर्णी हे शिवाजी पार्कचे रहिवासी. त्यांच्या पत्नी कै० सौ० इंदिराबाई यांची व माझी वनिता समाजांतील ओळख व नंतर दृढ मैत्री झाली व पुष्कळ वेळां कांही ना कांही कारणानें एकमेकींकडे जाणें येणें होऊन परिचय वाढला समाजांतील मनमोकळ्या व खेळीमेळीच्या वातावरणांत व सहलींच्या वेळी स्वभाव विशेष जमले. दरवर्षी आम्ही नवी कविता योजून दिवाळी शुभचिंतन कार्डे मित्रमैत्रिणी व नातेवाईकांना पाठवितों. मुद्दाम नमूद करावेंसें वाटते कीं, त्या ४ ओळींच्या कवितेबद्दल श्री विठ्ठलराव आपला मार्मिक अभिप्राय कळवून पत्रोत्तर पाठवून कौतुक करीत असत.

तुमच्याकडून आलेल्या पुस्तकांतील बहुतेक सर्व लेख वाचले. श्री० रा० भि० जोशी, सौ० सुधाताई जोशी, श्री० माधव मनोहर, सौ० गिरिजा कीर, सौ० मोहिनी निमकर, श्री० रा० कों० फाटक, श्री० वा० रा० ढवळे, सौ० सुमति देवस्थळे, श्री० बाळ कुडतरकर, श्री० व० दि० कुळकर्णी, मनोरमा फडके, सौ० उषा दातार सौ० आशा परचुरे वगैरे विविध क्षेत्रांतील मान्यवर मंडळींनीं व विद्यार्थी वर्गांनीं श्री० वि० ह० यांच्यासारख्या चतुरस्त्र व अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाबद्दल कांहीं अपेक्षा ठेवून केलेलें लेखन अत्यंत वाचनीय व मार्मिक आहे. ह्या सर्व मंडळींनीं लेख देऊन आपल्याला मोलाचें साह्य केलें.

आपण हें पुस्तक संपादित करून साहित्य क्षेत्रांत एका मौलिक पुस्तकाची भर घातली आहे असें म्हटल्यावांचून रहावत नाहीं. एकाच गोष्टीबद्दल हळहळ वाटली कीं वि० हं च्या देखत या पुस्तकाच्या प्रकाशनाचा योग आला नाहीं. आपणहि आपल्या मनोगतांत याचा उल्लेख केला आहेच.

श्री० प्रकाश मोहाडीकर यांच्या पुढाकारानें दादरच्या कांहीं व्यक्ति व संस्थांनीं श्री० वि० ह० कुळकर्णी यांचा अमृतमहोत्सव बालमोहन विद्यामंदिरांत आयोजिला होता. त्यावेळी आमच्या वनिता समाजातर्फे कार्यकारी मंडळाच्या संमतीनें गौरवगीत मी करून दिलें होतें. या समारंभाच्यावेळी ५ सुवासिनी ओवाळणार होत्या त्यांत सहभागी होण्याची संधि मला मिळाली हा एक सुयोगच म्हणायचा!

आम्ही पुढील आठवड्यांत कोथरूडला माझ्या मोठ्या सुनेकडे येणार आहोंत. तिथें आल्यावर तुम्हांला कळवीनच. आपण तेथें जरूर यावें.

थोर मंडळीस नमस्कार. लहानांस सप्रेम आशीर्वाद.

कळावे लोभ आहेच तो वृद्धिंगत व्हावा ही इच्छा.

आपली स्नेहेच्छु

सौ० ताराबाई वैद्य

# गो० ना० वैद्य



कर्तव्यदक्षस्य कुतो भयं स्यात् ।

G. N. VAIDYA, M.A., LL.B., F.T.A. (Ind.)
TEXTILE CONSULTANT
Technical Adviser:
MUKESH TEXTILE MILLS PVT. LTD.
BOMBAY 5.
MULCO TEXTILES LTD.
JINJA, UGANDA, EAST AFRICA.
KENYA RAYON MILLS
MOMBASA, KENYA.

Tel. Residence: 451464
36, GOODWILL ASSURANCE BLDG.,
WOOLLEN MILL LANE,
BOMBAY 16.

23-6-63

चि. सौ. आशाताईस अनेक आशीर्वाद विशेष.

आपण संपादित व संकलित केलेले "As you like him" हे कै. वि. ह. कुलकर्णी यांच्या आठवणींचे पुस्तक मोठ्या आपुलकीने पाठविले त्याबद्दल सौ. ताराबाई व मी आपले आभारी आहोत.

कै. वि. ह. कुलकर्णी आमचे घरापासून फक्त पाच-सहा मिनिटांचे अंतरावर रहात. आम्हा दोघांनाही शिवाजी पार्क मधील सामाजिक संस्था व मराठी साहित्य याबद्दल जिव्हाळा. पण माझे कार्यक्षेत्र असाहित्यिक असल्यामुळे ~~वि. ह. शी~~ व त्यांना पुरा ओळखून पडलो असल्यामुळे "वि. ह." शी माझा प्रत्यक्ष संबंध शेवटची पाच दहा वर्षेच व तो पण फार असावयास आला. सौ. ताराबाई बालमोहन मधील जुन्या कार्यकर्त्या व माजी अध्यक्षा म्हणून त्यांचा प्रथम कै. इंदिराबाई कुलकर्णी व नंतर ओघानेच "वि. ह." यांचाबरोबर अधिक संपर्क होता.

माझ्या माहितीप्रमाणे "वि. ह." (– आम्ही त्यांना कै. आप्पासाहेब म्हणत असू –) हे एक अत्यंत गाढे धार्मिक व मौलिक साहित्यिक होते. पण त्यांचे मौलिक विचार बरेचसे प्रासंगिक व वृत्तपत्रे आणि मासिके व त्यांनी गाजविलेल्या सभा यातून मांडले जात त्यामुळे त्यांची मौलिक ग्रंथसंपत्ति त्यांच्या व्यासंग व तपश्चर्येच्या

गो० ना० वैद्य ह्यांचे पत्र क्र० १.१



प्रकाशनांत फार मोठी आहे. मोठ्या कार्यक्षेत्रांत पुढारीपण
कोण? या प्रश्नाचें उत्तर जो स्वतःच्या दोन हातांवरच अवलंबून
न रहाता शेकडो हातांकडून यशस्वी काम करून घेतो तो असें आहे.
कै. अप्पासाहेब या व्याख्येंत चपखल बसतात. त्यांनी अनेक
तरुणांस व नवलेखकांस उत्तेजन व स्फूर्ति दिली व त्यांना योग्य
मार्गदर्शन करून अनेक हातांनी उदंड साहित्यसेवा करविली हेंच
त्यांच्या आयुष्यांत मोठेपणाचें रहस्य. याची साक्ष आपल्या
पुस्तकांतील प्रत्येक पानावर मिळते.

मराठी माणसाचें एक स्वतंत्र वैशिष्ट्य म्हणजे
साधारणपणे तो चांगल्या कार्याची प्रशंसा मोकळेपणानें करीत
नाही. उलट नवशिक्यांनाहि हात चे राखून ठेवतो. त्यामुळें साहित्यिकांस
व कलाकारांस, उत्स्फूर्त व दिलखुलास दाद फार कमीत मिळते.
पण योग्य वेळी निरपेक्ष मोकळ्या दादेचें खतपाणी मिळालें
तरच प्रतिभेला धुमारे फुटून ती पूर्ण विकसित होते. कै.
अप्पासाहेब यांनी ओळखून प्रत्येक उमलत्या कलाविकासाला
दाद व उत्तेजन दिलें. यावेळी एक दिवंगत रसिकाग्रणी
राजुभय्या दाते यांची आठवण येते. स्वतः मोठे संगीत कलाकार
नसतांना ~~[illegible]~~ कलावंतांस मनपसंत दाद देणारे रसिक अशी
त्यांची कीर्ति होती. त्यांची हार्दिक दाद व सक्रिय उत्तेजन कुमार
गंधर्वादि अनेक संगीतकलाकारांस स्फूर्तिप्रद झाल्याचें त्यांनी
कृतज्ञतेनें नमूद केलें आहे. कै. अप्पासाहेबांची साहित्य-
प्रांतांत अशीच रसिकाग्रणीची स्फूर्तिदायी भूमिका होती

गो० ना० वैद्य ह्यांचे पत्र क्र० १.२



आपल्या पुस्तकांतील विविध आठवणींतून अनेक आलेल्या साहित्यिकांनी त्यांच्याबद्दल उचितच कृतज्ञता प्रकट केली आहे.

साहित्याच्या विविध दालनांतील विषयांबद्दल वै आपणासारखे कोणी हलके स्फुट लेख - विचार परिस्फुट - लिहिले आहेत की या प्रकाशित वाङ्मयाची सूची अनेक अभ्यासकांना फार उपयोगी झाली असती. या पुस्तकाची दुसरी आवृत्ति निघेल त्यावेळी या सूचनेचा विचार व्हावा.

इतके छान पुस्तक तयार केल्याबद्दल आपले हार्दिक अभिनंदन व मला आवर्जून पाठविल्या-बद्दल हार्दिक आभार

गो. ना. वैद्य

गो० ना० वैद्य ह्यांचे पत्र क्र० १.३

**कर्तव्यदक्षस्य कुतो भयं स्यात् ।**

G. N. VAIDYA M.A., L.L.B., F.T.A. (Ind.)
TEXTILE CONSULTANT
Technical Adviser:
MUKESH TEXTILE MILLS PVT. LTD.
BOMBAY 5.
MULCO TEXTILES LTD.
JINJA, UGANDA, EAST AFRICA
KENYA RAYON MILLS
MOMBASA, KENYA

Tel. Residence: 451464
36, GOODWILL ASSURANCE BLDG.,
WOOLLEN MILL LANE,
BOMBAY 16.

१३-०८-८३

चि० सौ० आशाताईस अनेक आशीर्वाद विशेष

आपण संपादित व संकलित केलेले “As you Like him” हें कै० वि० ह० कुळकर्णी यांच्या आठवणींचें पुस्तक मोठ्या अगत्यानें पाठविलें त्याबद्दल सौ० ताराबाई व मी आपले आभारी आहोत.

कै० वि० ह० कुळकर्णी आमचे घरापासून फक्त पाच-सहा मिनिटांचे अंतरावर रहात. आम्हा दोघांनाहि शिवाजी पार्कमधील सामाजिक संस्था व मराठी साहित्य याबद्दल जिव्हाळा. पण माझें कार्यक्षेत्र असाहित्यिक असल्यामुळे व त्यांत पुरा गुंतून पडलों असल्यामुळे “वि० हं”शी माझा प्रत्यक्ष संबंध शेवटची पाच दहा वर्षेच व तो पण फार ओझरता आला. सौ० ताराबाई वनिता समाजामधील जुन्या कार्यकर्त्या व माजी अध्यक्ष म्हणून त्यांचा प्रथम कै० इंदिराबाई कुळकर्णी व नंतर तदनुषंगाने “वि० ह०” यांजबरोबर अधिक संपर्क होता.

माझ्या माहितीप्रमाणें “वि० ह०” (— आता त्यांना कै० अण्णासाहेब म्हणू या —) हे एक उत्तम गाढे मार्मिक व मौलिक साहित्यिक होते. पण त्याचे मौलिक विचार बरेचसें प्रासंगिक व वृत्तपत्रे आणि मासिकें व त्यांनी गाजविलेल्या सभा यातून मांडले जात त्यामुळे त्यांची मौलिक ग्रंथसंपत्ति त्यांच्या व्यासंग व तपश्चर्येच्या प्रमाणांत फार कमी आहे. माझ्या कार्यक्षेत्रात पुरुषोत्तम कोण ? या प्रश्नाचें उत्तर जो स्वतांच्या दोन हातांवरच अवलंबून न रहातां शेकडो हातांकडून यशस्वी काम करून घेतो तो असे आहे. कै० अण्णासाहेब या व्याख्येत चपखल बसतात. त्यांनी अनेक तरुणांस व तरुणींस उत्तेजन व स्फूर्ति दिली व त्यांना योग्य मार्गदर्शन करून अनेक हातांनी उदंड साहित्यसेवा करविली हेंच त्यांच्या अभिजात मोठेपणाचें रहस्य. याची साक्ष आपल्या पुस्तकांतील प्रत्येक पानावर मिळते.

मराठी माणसाचें एक खास वैशिष्ट्य म्हणजे साधारणपणें तो चांगल्या कार्याची प्रशंसा मोकळेपणानें करीत नाही. जरूर नसतांनाहि हातचे राखून ठेवतो. त्यामुळे साहित्यिकांस व कलाकारांस, उत्स्फूर्त व दिलखुलास दाद फार क्वचित मिळते. पण योग्यवेळी निरपेक्ष मोकळ्या दादेचें खतपाणी मिळालें तरच प्रतिभेला धुमारे फुटून ती पूर्ण विकसित होते. कै० अण्णासाहेब यांनी आवर्जुन प्रत्येक उमलत्या कलाविकासास दाद व उत्तेजन दिलें. यावेळी एक दिवंगत रसिकाग्रणी रामुभय्या दाते यांची आठवण येते. स्वतां मोठे संगीत कलाकार नसतांना कलावंतांस मनपसंत दाद देणारे रसिक अशी त्याची कीर्ति होती. त्यांची हार्दिक दाद व सक्रिय उत्तेजन कुमार गंधर्वादि अनेक संगीतकलाकारांस स्फूर्तिप्रद झाल्याचें त्यांनी कृतज्ञतेनें नमूद केलें आहे. कै० अण्णासाहेबांची साहित्यप्रांतात अशीच रसिकाग्रणीची स्फूर्तिदायी भूमिका होती. आपल्या पुस्तकांतील विविध आठवणीतून अनेक उमलत्या साहित्याकांनी त्यांचेबद्दल अशीच कृतज्ञता प्रकट केली आहे.

साहित्याच्या विविध दालनांतील विषयांबद्दल कै० अण्णासाहेबांनी इतके स्फूट लेख — विचारपरिप्लुत — लिहिले आहेत कीं या प्रकाशित वाङ्मयाची सूचि अनेक अभ्यासुकांना फार उपयोगी झाली असती. या पुस्तकाची दुसरी आवृत्ति निघेल त्यावेळी या सूचनेचा विचार व्हावा.

इतकें छान पुस्तक तयार केल्याबद्दल आपलें हार्दिक अभिनंदन व ते आम्हास आवर्जुन पाठविल्याबद्दल हार्दिक आभार.

गो० ना० वैद्य

# स० ह० कुळकर्णी





प्रा० वि० ह० कुळकर्णी ह्यांचे ज्येष्ठ बंधू स० ह० कुळकर्णी ह्यांचे पत्र

भागीरथी प्रसाद रानडे रोड
९९ शिवाजी पार्क मुंबई २८
दि ४।१२।८०

सप्रेम शुभाशीर्वाद

आपले दि २/१२ चे पत्र मिळाले. मी विचारलेली माहिती अगत्यपूर्वक आपण पाठविली याबद्दल आभारी आहे. मी आपल्या वडिलांना पाहिलेले आहे आणि त्यांची ख्यातीही ऐकलेली आहे. मी व प्रा वि० ह० १९१५ ते १९२५ फणसवाडीत, नंतर १९२५ ते ३१ गोरेगांवात व १९३१ ते आजतागायत दादरला राहिलेले आहोत त्यामुळे त्या वेळची पिढी त्यांचे कर्तृत्व आमच्या नजरेत आजही आहे. आपण मुंबईला याल तेव्हां जरूर भेटाच पण मीच आपणाला पुण्याला भेटण्याचा विचार करून राहिलों आहे. मी दि ८-१२ ला माझी ज्येष्ठ कन्या लीला, आचार्य जावडेकरांची सून, जी हल्ली इस्लामपूरला असते तिच्याकडे जात आहे २२/१२ च्या सुमारास पुण्याला येईन. पुण्याला माझी एक कन्या प्रभा हर्डीकर ही कर्वे रोडवर पटेल क्रॉक्समध्ये राहते.

पटेल क्रॉक्स हे डेक्कन वरून सुटणाऱ्या बसच्या कर्वे रोड वरील दुसऱ्या स्टॉपजवळ गणेश निकेतन हॉटेल आणि त्याच्यासमोर पेट्रोलचा मोठा पंप आहे तेथून नदीकडे जाणाऱ्या रस्त्यात अगदी टोकाला एक भले मोठे कंपाऊंड लागते. तेथे २०/२५ सुरूची झाडे आहेत तेथे राहते. पुण्याला आल्यावर मी आपणास कार्ड पाठवीन व भेटीत अधिक खुलासेवार बोलूं. आपल्याकडील सर्वास यथायोग्य नमस्कार व आशीर्वाद.

कळावे
आ०
स० ह० कुळकर्णी

# इरावती कुळकर्णी



श्री०

विलेपार्ले - पूर्व.
रविवार २५ नॉव्हें० '८०

प्रिय सौ० आशा धारप यांस
स० न० वि० वि०,

आपले पत्र पोचले. आपण माझ्याकडून जी मागणी केली आहे ती आनंददायी असली तरी कठीण आहे हे विचारांती मला कळून आले आहे. तथापि मी प्रयत्न करीन.

वर्तमानपत्रातून आपले 'आवाहन' वाचनात आले तेव्हा आश्चर्याचा गोड धक्का बसला. या कार्याची एवढी मोठी जबाबदारी उचलण्याची इच्छा एका विद्यार्थिनीला व्हावी यातच मला वाटते माझ्या वडिलांचे यश आहे.

या प्रकल्पामध्ये एक अडचण मला जाणवली म्हणजे विद्यार्थ्यांनी गुरुबद्दल लिहिताना एक [illegible] येणं अटळ आहे. शिवाय मनातून कितीही वाटत असलं तरी ते लिहून काढणे कठीण वाटते. सोपे वाटले तरी लिहिण्याचा [illegible] सहसा कुणी करीत नाही. त्यामुळे इतरांना लिहिते करणे हे आव्हान आहे व [illegible] जबाबदारी [illegible] आहे. यासंबंधी माझी वडिलांशी चर्चा झाली तेव्हां वडिलांनीही इतरांसंबंधी आठवणी लिहावयाच्या असल्याचे ठरले आहे असं कळलं. त्यामुळे बरं वाटलं व आठवणी बहुरंगी होतील.

केवळ 'गुरु' म्हणून लिहिताना सोपं असलं तरी माझा कौटुंबिक नात्यामुळे अनेक दृष्टीकोनातून लिहावयाचे आहे तरी आपली अपेक्षा माझ्याकडून किती प्रमाणात पूर्ण होऊ शकेल याबद्दल मी ~~साशंक~~ साशंक आहे. दिलेल्या मुदतीत लिहून देण्याचा मी प्रयत्न करीन. तथापि 'नोकरीमध्ये बहुतेक दिवस जात

प्रा० वि० ह० कुलकर्णी ह्यांच्या कन्या इरावती कुळकर्णी ह्यांचे पत्र क्र० १.१

श्री०

विलेपार्ले-पूर्व
रविवार २६ ऑक्टो० ८०

प्रिय सौ० आशा धारप यांस

स० न० वि० वि०

आपले पत्र पोचले. आपण माझ्याकडून जी मागणी केली आहे ती आनंददायी असली तरी कठीण आहे हे विचाराअंती मला कळून आले आहे तथापि मी प्रयत्न करीन.

वर्तमानपत्रातून आपले 'आवाहन' वाचनांत आले तेव्हां आश्चर्याचा गोड धक्का बसला. या कार्याची एवढी मोठी जबाबदारी उचलण्याची इच्छा एका विद्यार्थिनीला व्हावी यांतच मला वाटते माझ्या वडिलांचे यश आहे.

या उपक्रमामध्ये एक अडचण मला जाणवली म्हणजे विद्यार्थांनी गुरुबद्दल लिहीतांनां एकसुरीपणा येणे अटळ आहे. शिवाय मनांतून कितीही वाटत असलं तरी ते लिहून काढणें कठीण वाटते. सोपे वाटले तरी लिहीण्याचा साक्षेप सहसा कोणी करीत नाही. त्यामुळे इतरांना लिहीतें करणें हे ओघाने आले व तिच जबाबदारी अधिक आहे, यासंबंधी माझी वडिलांशी चर्चा झाली तेव्हां वडिलांनीही इतरांसंबंधी आठवणी लिहावयाच्या असल्याचे ठरलें आहे असं कळलं. त्यामुळें बरं वाटलं व आठवणी बहुढंगी होतील.

केवळ 'गुरु' म्हणून लिहीतांनां सोपं असलं तरी मला कौटुंबिक नात्यामुळें अनेक दृष्टीकोनातून लिहावयाचे आहे तरी आपली अपेक्षा माझ्याकडून किती प्रमाणांत पूर्ण होऊ शकेल याबद्दल मी साशंक आहे. दिलेल्या मुदतीत लिहून देण्याचा मी प्रयत्न करीन. तथापि नोकरीमध्ये बहुतेक दिवस जात असल्यामुळे थोडा अधिक अवधि लागण्याची शक्यता आहे. तसेंच लिहीण्याचा सरावही फारसा नाही. वडिलांचा हा मुख्य गुणही आम्ही घेऊ शकलो नाही.

असो,

आपण घेत असलेल्या श्रमाबद्दल वडिलांकडून कळत असतेंच. त्यामुळे याबद्दल अगदीच त्रयस्थाची भूमिका माझी नाही. तुम्हांला या उपक्रमाबद्दल सुयश चिंततांनां, स्वाभाविकच माझ्या वडिलांचा पर्यायानें गौरव आहे, हा स्वार्थ हेतु लपवितां येत नाही.

श्री० धारप यांनां सा० न० व मुलांनां अ० आशीर्वाद

कळावे

तुमची
इरावती कुळकर्णी

श्री०

१२ सुवर्णरेखा, महंत रोड विस्तारित
विलेपार्ले पूर्व मुंबई ४०००५७
रविवार २७.२.१९८३
Tel. No 626702

प्रिय सौ० आशा धारप यांना

स० न० वि० वि०,

पंधराएक दिवसापूर्वी मी तुम्हांला कार्ड टाकले होते. तुमच्याकडून सहसा उत्तर लगेच येते. तथापि तसें न आल्यामुळें कार्ड तुम्हांला मिळाले नसावे असे गृहीत धरते. व आशय परत लिहीते.

ती० अण्णांच्या आठवणींचे पुस्तक एव्हांना छपाई होऊन आले असावे. त्याच्या प्रकाशनासंबंधी तुमची योजना वा कल्पना कळण्याची इच्छा होती.

अण्णांचा जन्मदिवस १४ एप्रिल. यावर्षी गुढीपाडव्याची सुटी नेमकी या तारखेला आली आहे. त्याचा फायदा घेऊन हा समारंभ दादरला करता येईल का ? श्री० पु० ल० देशपांडे यांच्या हस्ते हा करतां आला तर प्रसंग उचीत अशी सभा होईल. माझी व त्यांची ओळख नाही. त्यामुळे त्यांना केवळ पत्राने विनंती करून ते येतील किंवा कसे याची शंका आहे. तुम्ही पुण्याला आहांत. तेव्हां तुम्ही कांही करूं शकाल. शिवाय तुमच्याजवळ तळमळीचे आर्जव आहे. त्यामुळें नकार येणार नाही. तरी यासंबंधी कांही करावयाचें झाले तर भरपूर अवधि असावा यासाठी कार्ड टाकले होते.

माझ्या योजनेशीं तुम्ही सहमत असावेच असे नाहीं. मी कल्पना मांडली. तुमची कल्पना कळण्याची अर्थातच उत्सुकता आहे.

पत्रोत्तर यावे.

श्री० धारप यांना सा० नमस्कार मुलांना अ० आशीर्वाद
कळावे

तुमची
इरावती कुळकर्णी

ता० क० : - अण्णां इस्माईल कॉलेजला सुरवातीला प्रोफेसर असतांनां श्री० पु० ल० देशपांडे तिथे विद्यार्थी होते असे स्मरते.

# वि० ह० कुळकर्णी


प्रा. वि. ह. कुळकर्णी – 123 शिवाजी पार्क, मुंबई-२८. मंगळवार ८ जुलै ८०

चि. सौ. आशा धारप हिस – सप्रेम अनेक आशीर्वाद.

सौ. आशा वि. धारप

पुणे-४११०२९

पिन PIN 411029

वि० ह० कुळकर्णी ह्यांचे पत्र क्र० ०१

प्रा० वि० ह० कुळकर्णी —१२३ शिवाजी पार्क, मुंबई-२८ मंगळवार ८ जुलै ८०
चि० सौ० आशा धारप हीस- सप्रेम अनेक आशीर्वाद

ता० ८ जुलैच्या 'लोकसत्तेत' तूं लिहिलेले पत्र वाचलें. तुझ्या मनातील भावना तूं अतिशय सुंदर व योग्य शब्दांत व्यक्त केल्या आहेस. त्याबद्दल धन्यवाद. त्याला कसा काय प्रतिसाद मिळतो ते आता पहायचे. आम्ही रोजचा लोकसत्ता घेत नाही. फक्त रविवारची सर्व वृत्तपत्रे घेतों. परंतु चि० सौ० वीणाच्या भावाने (सतीशने) आज सकाळी लोकसत्तेचा अंक आणून मला तूं लिहिलेले पत्र दाखविले. आणखी कोणकोणत्या वृत्तपत्रांना तूं हा मजकूर पाठविला आहेस व तो कोठे प्रसिद्ध झाला आहे ते शक्य झाल्यास कळवावे. तुझें वाचन कसें काय चालले आहे ? चि० सौ० वीणा सध्या फ्ल्यूने आजारी आहे. ताप सकाळी उतरतो व नंतर दुपारी चढतो. पण काळजी करण्याचें कारण नाही. औषध चालू आहे. मुलगा शाळेत जाणार व जयंत ऑफीसात जाणार त्यांचें जेवणाचे काम कसेबसे करते.

माझे शॉ वरील पुस्तक पुण्याच्या व्हीनसचे स० कृ०पाध्ये यांजकडे छापण्यास पाठविले आहे. प्रसिद्ध झाले म्हणजे कळवीनच. मी सध्या ग० त्र्यं० माडखोलकरांचे चरित्र लिहीत आहे. माझी प्रकृती ठीक. येथे पाऊस मधूनमधून पडत असतो. परंतु हवेत गारवा आला आहे. श्री० धारप यांस नमस्कार व मुलांस आशीर्वाद. कळावे

वि० ह० कुळकर्णी

ता० क०
सिद्ध-हस्त हा शब्द फक्त लेखकास उद्देशून वापरतात. शिक्षकास जन्मजात शिक्षक

Prof V. H. KULKARNI, M.A.
Shahade Sadan, 123, Shivaji Park
Dadar, BOMBAY = 28

बुधवार, २८ जाने ८१

सौ० आशा हीस- सप्रेम आशीर्वाद

सौ० चारुशीला गुप्ते, वसंत देशमुख, वामन ढवळे, मोहाडीकर प्रा० भागवत ही मंडळी माझ्याकडे आठवणी लवकरच पाठविणार आहेत. मात्र वैजनाथ आठल्ये व स्नेहप्रभा प्रधान यास तूंच स्मृतिपत्रें पाठवावी. श्री० आठल्ये तुझ्याकडेच पाठविणार असल्याचें म्हणाले. व स्नेहप्रभा प्रधान माझ्या बर्नार्ड शॉ वर परीक्षण लिहिणार असल्यामुळे मी सांगण्याऐवजी तूंच स्मृतिपत्र लिहिणे अधिक बरें

माझी प्रकृति ठीक असून आता सर्व लक्ष ग० त्र्यं० माडखोलकर चरित्र लिहिण्यासाठी केंद्रित केले आहे कळावे

तुमचा —
वि० ह० कुलकर्णी

# वि० स० खांडेकर

॥ श्री ॥

ज्योत्स्ना
मुंबई ४
शिरोडें ३१-१-३७

श्री० विठ्ठलराव कुळकर्णी यांस[१]
स० न० वि० वि०

ज्योत्स्नेची संपादकीय जबाबदारी आपण सर्व हल्ली सारखी घेत असल्यास तिची आर्थिक जबाबदारी घेण्याला माणसें मिळूं शकतील. मात्र ढवळ्यांच्या पत्रावरून आजची स्थिती इतकी आशाजनक आहे कीं तसें करणें अंती फारसें हितावह ठरणार नाहीं. तथापि आजच्या आशा सफल व्हायला आणखी दोन वर्षे तरीं ढवळ्यांना व तुम्हांला खूप यातायात करावी लागेल. तुमच्या दैनिक व्यापाची मला पूर्ण कल्पना आहे. म्हणून तुम्ही ज्योत्स्नेसाठी अमूक वेळ दिलाच पाहिजे अशी अपेक्षा मी करणार नाही. व्यवस्था व आर्थिक जबाबदारी दुसऱ्याकडे गेल्यास काम बरेंच सोपें होईल. तरी तुमच्या व ढवळ्यांच्या अनुभवांवरच या गोष्टीचा निकाल लावणें इष्ट होईल. माझें म्हणणे मी दोन पत्रांत मांडलेच आहे. म्हणून त्याविषयीं अधिक पाल्हाळ करीत नाही.

प्रिव्हीयस इंटरला मराठी येत असल्यामुळे प्राथमिक स्वरुपाचे लघुनिबंधाचे एक पुस्तक विवेचक प्रस्तावनेसह प्रसिद्ध केल्यास फायदेशीर ठरेल असें माझें व यशवंतरावांचे बोलणें झालें होतें. पुण्याच्या कॉलेजातील मंडळी असल्या पुस्तकाच्या खटपटींत आहेत असें ऐकतों. तरी आघाडी मारून आपल्याला एखादें चांगलें पुस्तक काढतां येईल कायं ? आडगांव, प्रकृति व बोलपटांचे काम यामुळें यावेळीं माझ्या हातून असल्या पुस्तकाचें संपादन होणं शक्य दिसत नाहीं. तुम्ही पुढाकार घेतल्यास जरूर ते साहाय्य मी करूं शकेन. तरी विचार व्हावा.

सर्वांना नमस्कार. क० लो० अ० ही विनंती.

तुमचा
भाऊ खांडेकर

---

[१] सदर मूळ पत्राचे छायाचित्र उपलब्ध नाही. प्रा० वि० ह० कुळकर्णी ह्यांच्या संग्रहातील पत्राची श्रीमती आशा धारप ह्यांनी प्रत करून घेतली होती. त्यानुसार हे पत्र इथे देण्यात येत आहे.

# परशुराम देशपांडे



Recd on Sat. 13/9/08

परशुराम देशपांडे
२०१, 'ट्युलिप'
कॉस्मॉपोलिटन हा. सोसायटी
आय. टी. आय. रोड. औंध. पुणे-७
दि ८ सप्टें. '०८

सुश्री इरावती कुलकर्णी यांस,
स. न. वि. वि.

आपले बंधू श्री हेमंत कुलकर्णी यांनी सांगितल्यानुसार माझ्या 'द टेम्पेस्ट' या पुस्तकाच्या दोन प्रती मी आपणाकडे पाठवीत आहे.

हे पुस्तक मी आपले दिवंगत तीर्थरूप स्व. विठ्ठल हरि कुलकर्णी यांस समर्पित केले आहे.

हे पुस्तक पुस्तकरूपाने उजेडात यावे या साठी आपले बंधु श्री. हेमंत कुलकर्णी यांनी मला बहुमोलाची मदत केली आहे. त्यांचे आभार मानण्यासाठी माझ्याजवळ पुरेसे शब्द नाहीत.

त्यांच्या म्हणण्यानुसार आपण स्वतः रसिक वाचक आहात. हे पुस्तक आपल्या पसंतीस उतरेल अशी आशा वाटते.

प्रा. स्व. वि. ह. कुलकर्णी यांच्या मला परिचय झाला होता तो केवळ एका जुन्या पुस्तकातील एका स्फुट लेखामुळे. १९६४ साली मराठी नाट्य परिषदेने प्रकाशित केलेल्या 'रूपकम्- शेक्सपिअर खंड' या पुस्तकातील स्व. वि. ह. कुलकर्णी यांच्या 'शेक्सपिअरच्या नायिका' या लेखामुळे माझे स्वतःचे शेक्सपिअरचे आकलन अधिक स्पष्ट झाले आणि माझ्या विचारांना एक वेगळी दिशा लाभली. त्यांचे हे ऋण या पुस्तकाच्या रूपाने फेडण्याचा मी प्रयत्न केला आहे. श्री. हेमंत कुलकर्णी यांनी मला या पुस्तकासाठी मदत करणे हा योगायोग नसून स्व. वि. ह. कुलकर्णी यांचा आशीर्वाद आहे असे मला वाटते. कारण तोवर श्री. हेमंत कुलकर्णी हे स्व. वि. ह. कुलकर्णी यांचे सुपुत्र असल्याचे मला माहीत नव्हते. असो.

या पुस्तकाची एक प्रत श्री. हेमंत कुलकर्णी यांना मिळण्याची तजवीज आपण करालच. तरीही आपल्या आणखी कोणा आप्तेष्टांस हे पुस्तक हवे असेल तर तसे कळवावे.

धन्यवाद.

आपला,
परशुराम देशपांडे
9520/(फोन नं. 32303866)

परशुराम देशपांडे ह्यांचे पत्र क्र० ०१

परशुराम देशपांडे
२०१, 'ट्युलिप'
कॉस्मॉपोलिटन हा. सोसायटी
आय. टी. आय. रोड. औंध. पुणे-७
दि ८ सप्टें. ०८

सुश्री॰ इरावती कुलकर्णी यांस
स॰ न॰ वि॰ वि॰

आपले बंधु श्री॰ हेमंत कुलकर्णी यांनी सांगितल्यानुसार माझ्या ‘द टेम्पेस्ट’ या पुस्तकाच्या दोन प्रती मी आपणाकडे पाठवीत आहे.

हे पुस्तक मी आपले दिवंगत तीर्थरूप स्व॰ विठ्ठल हरि कुलकर्णी यांस समर्पित केले आहे.

हे पुस्तक पुस्तकरूपाने उजेडात यावे यासाठी आपले बंधु श्री॰ हेमंत कुलकर्णी यांनी मला बहुमोलाची मदत केली आहे. त्यांचे आभार मानण्यासाठी माझ्याजवळ पुरेसे शब्द नाहीत.

त्यांच्या म्हणण्यानुसार आपण स्वतः रसिक वाचक आहात. हे पुस्तक आपल्या पसंतीस उतरेल अशी आशा वाटते.

प्रा॰ स्व॰ वि॰ ह॰ कुलकर्णी यांचा मला परिचय झाला होता तो केवळ एका जुन्या पुस्तकातील एका स्फुट लेखामुळे. १९६४ साली मराठी नाट्य परिषदेने प्रकाशित केलेल्या ‘रूपकम्-शेक्सपिअर खंड’ या पुस्तकातील स्व॰ वि॰ ह॰ कुलकर्णी यांच्या ‘शेक्सपियरच्या नायिका’ या लेखामुळे माझे स्वतःचे शेक्सपिअरचे आकलन अधिक स्पष्ट झाले आणि माझ्या विचारांना एक वेगळी दिशा लाभली. त्यांचे हे ऋण या पुस्तकाच्या रूपाने फेडण्याचा मी प्रयत्न केला आहे. श्री॰ हेमंत कुलकर्णी यांनी मला या पुस्तकासाठी मदत करणे हा योगायोग नसून स्व॰ वि॰ ह॰ कुलकर्णी यांचा आशीर्वाद आहे असे मला वाटते. कारण तोवर श्री॰ हेमंत कुलकर्णी हे स्व॰ वि॰ ह॰ कुलकर्णी यांचे सुपुत्र असल्याचे मला माहीत नव्हते. असो.

या पुस्तकाची एक प्रत श्री॰ हेमंत कुलकर्णी यांना मिळण्याची तजवीज आपण करालच. तरीही आपल्या आणखी कोणा आप्तेष्टांस हे पुस्तक हवे असेल तर तसे कळवावे.

धन्यवाद.

आपला,
परशुराम देशपांडे



॥ॐ श्री॥

परशुराम देशपांडे
२०१. ट्युलिप
कॉस्मॉपोलिटन हा. सोसायटी
आय. टी. आय. रोड
औंध. पुणे - ४११००७

Tel.
पुणे ९५२०/32303866

दि. ४ डिसेंबर २००८.

सुश्री इरावती कुलकर्णी यांस,
स. न. वि. वि.

मी माझे 'द टेम्पेस्ट' आपणास पाठवले होते. त्यावरून झालेले बोलणे आपल्या स्मरणात असेल.

आपण सांगितल्याप्रमाणे मी स्व. वि. ह. कुलकर्णी यांची पुस्तके मिळवण्यासाठी प्रयत्न केला. माझ्या सुदैवाने 'मॅजेस्टिक प्रकाशन'च्या व्यवस्थापकांनी त्यांच्या गोदामातून 'व्यक्तिरेखा' आणि 'निवडक लेख' ही दोन्ही पुस्तके मला काढून दिली.

ही दोन्ही पुस्तके स्व. वि. ह. कुलकर्णी यांच्या विद्वत्तेची आणि त्यांच्या लेखणीच्या सामर्थ्याची साक्ष देण्यास पुरेशी आहेत. हे सगळे लेख संकलित करून पुस्तकरूपाने प्रकाशित करून व्यक्तिशः तुम्ही फार मोठी साहित्यसेवा केली आहे. कारण अशी पुस्तके जणू अमूल्य ठेव्यासारखी असतात. हे लेख सत्तर-पंचाहत्तर वर्षांपूर्वीचे असूनही आजही तितकेच उद्बोधक आहेत. त्यातून एका विशिष्ट कालखंडाची स्पंदने स्पष्टपणे ऐकू येतात. स्व. कुलकर्णी यांनी वेगवेगळ्या साहित्य-प्रकारांविषयी केलेले समीक्षात्मक लेखन पाहून त्यांच्या विचक्षणतेची साक्ष पटते आणि थक्क व्हायला होते.

एरव्ही रूक्ष असणारे समीक्षात्मक लेखन स्व. कुलकर्णी यांच्या लेखणीतून उतरताना मोहक मनोवेधक होऊन जाते. कारण त्या लेखनाला असलेली सहृदय आणि निकोप अशा मिश्किलतेची किनार. या सगळ्या लेखनातून आपल्यासमोर एका प्रकांडपंडीत तरीही बालसदृश निरागस व्यक्तिमत्वाची छबी उभी राहते. जीवनावर आणि मानवजातीवर प्रेम करणारी माणसंच अशा प्रकारे 'प्रौढत्वे निज शैशवास' जपतात आणि चिरंतन होऊन जातात.

मी योगायोगांना फार मानतो; आणि माझा असा विश्वास आहे की श्री. हेमंत कुलकर्णी आणि तुमच्या माध्यमाद्वारे मला स्व. वि. ह. कुलकर्णी यांच्या संपर्कात त्यांच्या पुस्तकांच्या रूपाने लाभले होते. हे भाग्य निश्चितच माझ्या नशिबी होते.
या दोन्ही पुस्तकांसाठी मी तुमचा अतिशय आभारी आहे.
तुम्हाला पुन्हा एकदा हार्दिक शुभेच्छा.

आपला नम्र,
sd/ परशुराम देशपांडे
(पुणे)

परशुराम देशपांडे ह्यांचे पत्र क्र० ०२

॥ ॐ श्री ॥

परशुराम देशपांडे
२०१ 'ट्युलिप' कॉस्मोपॉलिटन हा. सोसायटी
आ. टी. आय. रोड
औंध पुणे- ४११००७
दि. ४ डिसेंबर २००८

Tel.
पुणे 9520/32303866

सुश्री० इरावती कुलकर्णी यांस,
स० न० वि० वि०

मी माझे 'द टेम्पेस्ट' आपणास पाठवले होते, त्यावरून झालेले बोलणे आपल्या स्मरणात असेल.

आपण सांगितल्याप्रमाणे मी स्व० वि० ह० कुलकर्णी यांची पुस्तके मिळवण्यासाठी प्रयत्न केला. माझ्या सुदैवाने मॅजेस्टिक प्रकाशन' च्या व्यवस्थापकांनी त्यांच्या गोदामातून 'व्यक्तिरेखा' आणि 'निवडक लेख' ही दोन्ही पुस्तके मला काढून दिली.

ही दोन्ही पुस्तके स्व० वि० ह० कुळकर्णी यांच्या विद्वत्तेची आणि त्यांच्या लेखणीच्या सामर्थ्याची साक्ष देण्यास पुरेशी आहेत. हे सगळे लेख संकलित करून पुस्तकरूपाने प्रकाशित करून व्यक्तिश: तुम्ही फार मोठी साहित्यसेवा केली आहे. कारण अशी पुस्तके जणू अमूल्य ठेव्यासारखी असतात. हे लेख सत्तर-पंचाहत्तर वर्षांपूर्वीचे असूनही आजही तितकेच उद्‌बोधक आहेत. त्यातून एका विशिष्ट कालखंडाची स्पंदने स्पष्टपणे ऐकू येतात. स्व० कुलकर्णी यांनी वेगवेगळ्या साहित्यप्रकारांविषयी केलेले समीक्षात्मक लेखन पाहून त्यांच्या विचक्षणतेची साक्ष पटते आणि थक्क व्हायला होते.

एरव्ही रुक्ष असणारे समीक्षात्मक लेखन स्व कुलकर्णी यांच्या लेखणीतून उतरताना मोठे मनोवेधक होऊन जाते. कारण त्या लेखनाला असलेली सहृदय आणि निकोप अशा मिश्किलतेची किनार. या सगळ्या लेखनातून आपल्यासमोर एक प्रकांडपंडीत तरीही बालसदृश्य निरागस व्यक्तिमत्वाची छबी उभी राहते. जीवनावर आणि मानवजातीवर प्रेम करणारी माणसंच अशा प्रकारे 'प्रौढत्वे निज शैशवास' जपतात आणि चिरंतन होऊन जातात.

मी योगायोगांना फार मानतो; आणि माझा असा विश्वास आहे की श्री० हेमंत कुलकर्णी आणि तुमच्या माध्यमाद्वारे मला स्व० वि० ह० कुलकर्णी यांच्या संपर्कात त्यांच्या पुस्तकांच्या रूपाने यायचे होते. हे भाग्य निश्चितच माझ्या नशिबी होते. या दोन्ही पुस्तकांसाठी मी तुमचा अतिशय आभारी आहे.

तुम्हाला पुन्हा एकदा हार्दिक शुभेच्छा.

आपला नम्र
Sd/ परशुराम देशपांडे
पुणे

# प्रकाशनसमारंभाची छायाचित्रे



वि० ह० कुळकर्णी व त्यांच्या पत्नी ह्यांच्या छायाचित्रांसह इरावती कुलकर्णी आणि आशा धारप



अॅज यू लाइक हिम ह्या पुस्तकाचा प्रकाशनसमारंभ : बसलेले डावीकडून डॉ० विठ्ठल प्रभू, डॉ० राम जोशी, डॉ० सरोजिनी वैद्य तसेच बोलताना आशा धारप



प्रकाशनसमारंभाला उपस्थित श्रोतृवर्ग. पुढेच प्रा० रमेश तेंडुलकर (क्रिकेटपटू सचिन तेंडुलकर ह्यांचे वडील.)



धनंजय कीर आणि आशा धारप



डॉ० राम जोशी (मागे) मालिनी केतकर आणि आशा धारप

# प्रकाशनसमारंभाचे वार्तांकन

## वि. ह. कुलकर्णी यांच्या आठवणी

महाराष्ट्र टाईम्स मंगळवार १९।४।८३.

मुम्बई, सोमवार (प्रतिनिधी) — ज्येष्ठ समीक्षक स्व. प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्या आठवणींच्या 'अॅज यू लाइक हिम' या संग्रहाचें प्रकाशन काल मुम्बई विद्यापीठाचे कुलगुरु प्रा. राम जोशी यांच्या हस्ते झाले.

प्रा. कुळकर्णी यांचे विद्यार्थी, मित्र, सहकारी व साहित्यिक यांनी लिहिलेल्या आठवणी या पुस्तकात संग्रहीत करण्यांत आल्या आहेत.

प्रकाशन समारंभात प्रा. रा. भि. जोशी, श्रीमती सरोजिनी वैद्य, प्रा. अविनाश केळकर व श्रीमती आशा धारप यांची भाषणे झाली. प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्या कन्या श्रीमती इरावती कुळकर्णी यांनी पुस्तक-निर्मितीबद्दल कृतज्ञता व्यक्त केली.

महाराष्ट्र टाइम्स : १८ एप्रिल १९८३

# प्रेमळ नि आदर्श प्राध्यापक

## प्रा. वि. ह. कुळकर्णी यांना आदरांजली

(आमच्या प्रतिनिधीकडून)

मुंबई, ता. १७:–"ज्यांच्याविषयी अंत:करणात जिव्हाळा निर्माण झाला त्यांच्यावर आयुष्यभर अव्याज, अकृत्रिम प्रेम करणारा आदर्श माणूसवेडा प्राध्यापक!" अशा शद्वात मुंबई विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. राम जोशी यांनी आज कै. प्रा. वि. ह. कुळकर्णी यांना आदरांजली वाहिली.

कै. प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्या एक विद्यार्थिनी सौ. आशा धारप यांच्या पुढाकाराने कै. प्रा. कुळकर्णी यांच्या विविध आठवणींचा संग्रह 'अॅज यू लाइक हिम' या नावान पुण्याच्या संजय प्रकाशनने प्रकाशित केला असून त्याचा प्रकाशन समारंभ आज मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या सभागृहात डॉ. राम जोशी यांच्या हस्ते झाला.

### मानदंड

"शिक्षणक्षेत्रात जेव्हा प्रा. न. र. फाटक, प्रा. द. के. केळकर, प्रा. गोवर्धन पारीख यांच्यासारख्या महाराष्ट्राच्या शैक्षणिक आणि बौद्धिक जीवनाचा मानदंड ठरणाऱ्या महान् व्यक्ती वावरत होत्या, त्याच काळातील प्रा. वि. ह. कुळकर्णी हे एक महान् व्यक्तित्व! त्याच मानदंडांच्या पठडीत बसणारे! शिक्षणक्षेत्रात तो काळ वसंताच्या बहरासारखा होता," असे डॉ. राम जोशी म्हणाले.

"माणसाचे मोठेपण त्याच्या अखेरीस त्याची विद्वत्ता, साहित्य कार्य वा संस्था याद्वारे मोजले जाते. पण काहींही दृश्य स्मारक न ठेवता प्रा. वि. ह. कुळकर्णी अमाप लोकप्रियता मिळवून गेले, ते सर्वांच्या मनाच्या चंदनी पेटीत असंख्य स्मृतींचा सुगंध ठेवून! अंत:प्रेरणेशी प्रामाणिक राहून जीवन जगणे यातच माणसाचे मोठेपण असते," असे डॉ. राम जोशी म्हणाले.

### वात्सल्यमूर्ती

प्रा. सरोजिनी वैद्य म्हणाल्या, "न्यूनगंडाने वागणाऱ्या व्यक्तीला वात्सल्यपूर्ण निरोगी वृत्तीने वागवून उत्तेजन देऊन पुढे आणण्याचे कार्य प्रा. कुळकर्णी यांनी केले."

"या आठवणींच्या संग्रहाद्वारे वाचकांच्या हाती एक अमोल लेणे दिले गेले आहे. हा संग्रह सात–आठ महिन्यापूर्वी प्रसिद्ध झाला असता, तर प्रकाशन समारंभात प्रा. वि. ह. कुळकर्णी तुम्हा–आम्हाला दिसले असते," असे सांगून प्रा. रा. भि. जोशी म्हणाले, "प्रा. वि. ह. कुळकर्णी यांनी आत्मचरित्र लिहिले असते, तर ते उद्‌बोधक, रोचक ठरले असते. कारण विविध क्षेत्रातील अमाप व्यक्तींशी त्यांचा संबंध आला होता. त्यांच्या लेखनात एकसुरीपणा नव्हता आणि कंटाळवाणेपणाही नव्हता. प्रा. वि. ह. कुळकर्णी यांची स्मृती होते, तेव्हा एक व्यासंगी, सुसंस्कृत, समतोल वृत्तीचे, स्वत: हंसणारे आणि दुसऱ्याला हंसविणारे, कुणाला न दुखविणारे व्यक्तिचित्र नजरेसमोर उभे राहते."

### सदा टवटवीत

"माणसाच्या मनाला सौजन्यशील वृत्तीने जपणारी माणसे दुर्मिळ! प्रा. वि. ह. कुळकर्णी त्यातील एक," असे सांगून डॉ. विठ्ठल प्रभू म्हणाले, "वैफल्य नावाची चीज असते हे त्याना ठाऊक नव्हते. वृत्तीत सतत टवटवीतपणा, जिवंतपणा! निवृत्तीनंतर जीवनात एकप्रकारची पोकळी निर्माण होते; पण अण्णांनी (प्रा. कुळकर्णी) आपल्या जीवनात ती निर्माण होऊं दिली नाही. मिष्किलपणा आणि पांडित्य यांचे कॉकटेल त्यांच्यापासून आम्हाला मिळाले. समाजाला संस्कार दिले. मित्राना जीवनाचा अर्थ समजावून सांगितला. शब्दांना रंग असतो, छटा असतात, अर्थ असतो हे त्यांनी आम्हाला दाखवले."

डॉ. विठ्ठल प्रभू यांनी प्रा. कुळकर्णी यांच्या अनेक गंमतीदार आठवणी सांगितल्या.

"मराठी कसे शिकावे आणि मराठी कसे शिकवावे हे प्रा. कुळकर्णी यांनी आम्हाला शिकवले. ते इंग्रजीचे प्राध्यापक, पण त्यांचे मराठी अध्यापनही माझ्या मनावर ठसा उमटवून गेले. त्यांच्या मिष्किलपणाचा उल्लेख नेहमी होतो. त्यात उपहास व उपरोध होता. खेळकरपणा होता," असे सांगून प्रा. अविनाश केळकर म्हणाले, "निरनिराळ्या दिवाळी अंकातून त्यांनी विविध विषयावर दोनशे लेख लिहिले. ते एकत्रित करून त्यांचा संग्रह कुणी तरी प्रकाशकाने प्रसिद्ध करणे आवश्यक आहे. विठ्ठलरावांचे अनेक संस्थांशी संबंध होते. पण ते राजकारणी नव्हते."

कै. प्रा. कुळकर्णी यांच्या कन्या सौ. इरावती कुळकर्णी यांनी या आठवणींच्या संग्रहाबद्दल, कृतज्ञता व्यक्त करून अनेक हृद्य आठवणी सांगितल्या.

सौ आशा धारप यांनी प्रास्ताविक निवेदनात पुस्तकामागील भावना स्पष्ट करून सर्वांचे स्वागत केले.



कै. प्रा. वि. ह. कुळकर्णी यांच्या आठवणी संग्रहित केलेल्या 'अॅज यू लाईक हिम' या पुस्तकाचे प्रकाशन कुलगुरू डॉ. राम जोशी करीत आहेत. (छाया:– भगवान भट्टिगे)

मुंबई सकाळ १८-४-८३

सकाळ : १८ एप्रिल १९८३

# प्रा. वि. ह. कुलकर्णी नाबाद ८०

मराठीतील एक नामवंत ज्येष्ठ लेखक, वक्ते आणि इंग्रजीचे प्राध्यापक वि. ह. कुलकर्णी हे १४ एप्रिल१९८२ रोजी आपल्या वयाची ऐंशी वर्षे पूर्ण करून एक्याऐंशी वर्षात पदार्पण करीत आहेत. त्यांना पाऊणशे वर्षे झाली त्यावेळी मुंबईत त्यांचा जाहीर सत्कार करण्यात आला होता. त्यावेळी त्यांच्या चहात्यांनी, विद्यार्थ्यांनी आणि परिचित माणसांनी एवढी गर्दी केली की दादरच्या बालमोहन शाळेचे सभागृह अपुरे पडले. एक प्राध्यापक म्हणून त्यांनी किती लोकप्रियता संपादन केली आहे याचा प्रत्यय आला.

त्यानंतरच्या गेल्या पाच वर्षात त्यांनी 'संदेश'कार अच्युतराव कोल्हाटकर आणि प्रख्यात इंग्रजी नाटककार जॉर्ज बर्नार्ड शॉ यांच्यावरील दोन महत्त्वाचे मराठी ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले. तसेच 'किशोर' मासिकातून "आधुनिक महाराष्ट्राचे शिल्पकार" ही लेखमाला लिहून ती आता ग्रंथरूपाने प्रसिद्ध केली आहे. शिवाय, बालपणापासूनचे आपले मित्र, प्रसिद्ध साहित्यिक, ग. त्र्यं. माडखोलकर यांचे विस्तृत चरित्र लिहून पूर्ण केले असून तेही प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

पूर्वायुष्यात वाढती कौटुंबिक जबाबदारी आणि इतर अनेक अपरिहार्य कारणें यामुळे त्यांच्या हातून भरीव स्वरूपाची ग्रंथरचना झाली नव्हती. ही उणीव त्यांनी आयुष्याच्या सायंकाळी पूर्ण केली आहे. आयुष्याच्या सायंकाळी मागे वळून पहाताना कुणाही लेखकाला समाधान मिळावे, कृतार्थता वाटावी अशीच ही कामगिरी आहे. शिवाय, "व्यक्तिचित्रे" हे चाळीस वर्षापूर्वी प्रसिद्ध झालेले व्यक्तिचित्रांचे पुस्तक, ऑस्कर वाइल्डच्या "विंडरमियर्स फॅन" या नाटकाचा "शोभेचा पंखा" या नावाने केलेला अनुवाद आणि गेल्या पन्नास वर्षांच्या प्रदीर्घ कालखंडात



वेगवेगळ्या नियतकालिकातून प्रसिद्ध झालेले शेकडो फुटकळ लेख! एखाद्या वाङ्मयप्रेमी प्रकाशकाने मनात आणले तर या लेखातील निवडक लेखांचे चार-पाच संग्रह सहज प्रसिद्ध करता येतील.

## एक हाडाचे प्राध्यापक

वि. ह. ना वाङ्मयाची गोडी लागली ती शालेय जीवनात. कॉ. डांगे, पत्रकार त्र्यंबक विष्णु पर्वते, ग. त्र्यं. माडखोलकर हे त्याचे मुंबईतील आर्यन शाळेतील सहाध्यायी. पुढे झेवियर कॉलेजात गेल्यावर कथालेखक खं. सा. दौंडकर, प्रा. अनंत काणेकर, के. नारायण काळे, वा. रा. ढवळे इत्यादी मित्रांच्या सहवासात त्यांचे साहित्यप्रेम वृद्धिंगत झाले. त्यांच्या व्यासंगाला विशिष्ट दिशा मिळाली. याच कालखंडात साहित्यसम्राट नरसिंह चिंतामण केळकर यांच्या एकसष्टाव्या वाढदिवसानिमित्त (१९३२) जो गौरवग्रंथ प्रसिद्ध झाला त्यात वि. हं.चा लेख आहे. या महान ग्रंथात केळकरांच्या बहुविध कामगिरीचे दर्शन घडविणारे विविध लेखकांचे लेख आहेत. तसेच त्यांच्या वाङ्मयाचे तौलनिक विवेचन करणारे समीक्षालेख आहेत. या लेखासाठी विठ्ठलरावांनी केळकरांच्या समग्र साहित्याचा व्यासंग करून "केळकरांचे वाङ्मयीन विशेष" हा उत्कृष्ट लेख लिहिला. तो लेख वाचला की त्यातील सखोल व्यासंगाची साक्ष पटते. खुद्द केळकरांनाही तो लेख वाचून आश्चर्य वाटले. मुंबईला आले असता मुद्दाम पत्ता काढीत ते विठ्ठलरावांच्या घरी आले. "तुम्ही माझे समग्र साहित्य वाचलेत तरी कधी?" साहित्य सम्राटांच्या या प्रश्नाला वि.हं. नी काय उत्तर दिले कुणास ठाऊक! परंतु या लेखानें त्यांना लेखक-समीक्षक म्हणून फार मोठा लौकिक मिळाला. साहित्य क्षेत्रात त्यांचे नाव सर्वतोमुखी झाले

'प्रतिभा' या वाङ्मयीन पक्षिकाचे

(पान ४ वर)

सांज तरुण भारत, १३-४-८२

तरुण भारत :